


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.
ख्यातकीर्त ग्रंथसंग्राहक, संशोधक, संपादक आणि समीक्षक डॉ. स. गं. मालशे ह्यांच्या संग्रहातील जुन्या नियतकालिकांचे काही अंक संगणकीकरण करून अभ्यासकांना उपलब्ध व्हावेत ह्यासाठी त्यांच्या कन्या डॉ. सुषमा पौडवाल ह्यांनी राज्य मराठी विकास संस्थेला उपलब्ध करून दिले आहेत.
ह्या ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१) सदर ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२) सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३) पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४) आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.






अनुक्रमणिका

॥ श्री ॥

# विविध ज्ञान विस्तार

## मासिक पुस्तक

( स्थापना जुलै १८६७ )

## वर्ष ६४ वें

नोव्हेंबर--डिसेंबर १९३३ अंक ११-१२



Editor & Publisher—A. A. Moramkar
Printed by R. K. Tatnis at Shree Laxmi-Narayan Press. Published for Nadkarni & Mandali, at 364 Thakurdwar, Bombay (2).

वार्षिक वर्गणी आगाऊ ट. हं. सह ३ रुपये ........................ या अंकाची किंमत बारा आणे




अनुक्रमणिका

आमचे मित्र रा. रा. **वसंतराव नारायण नाईक**, एम्. ए. हे मुंबई युनिव्हर्सिटी सिनेटच्या, रजिस्टर्ड ग्रॅज्युएटसतर्फे येत्या जूनमध्यें होणाऱ्या फेलोच्या जागेसाठीं उमेदवार म्हणून उभे राहिले आहेत. आमच्या रजिस्टर्ड पदवीधर मित्रांनीं त्यांना आपलें पहिलें मत द्यावें अशी आमची विनंती आहे.

संपादक—**वि. विस्तार**

# साल-अखेर

या वर्षी 'विस्तारा'चे अंक अनेक अडचणींमुळें अनियतमितपणें निघाले. १९३४ च्या जानेवारीचा म्हणजे ६५ व्या वर्षाचा पहिला अंक चालू महिन्यांत प्रसिद्ध होईल. त्यानंतर फेब्रुवारी-मार्च व एप्रिल-मे असे जोड अंक काढून, पुढील अंक वेळेवर प्रसिद्ध करण्याची व्यवस्था केली आहे. या वर्षी अंक निघण्यास झालेल्या अनियमितपणाबद्दल वाचक क्षमा करतील अशी आशा आहे.

चालू सालीं एक महत्त्वाचा विषय स्वतंत्र पृष्ठें देऊन चालू केलेला वाचकांच्या लक्षांत असेलच. हा विषय, महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांनीं केलेलें पातंजलमहाभाष्याचें मराठी भाषांतर, हा होय. हें भाषांतर 'विस्तारां'तून पुढें प्रसिद्ध करण्याबाबतींत आम्हीं गेल्या अंकांत वाचकांचा सल्ला विचारला होता. त्याप्रमाणें बऱ्याच जणांनीं 'विस्तारां'तून हा विषय अवश्य द्यावा असें आम्हांस कळविलें व त्याप्रमाणें तो क्रमशः देण्याचें आम्हीं ठरविलें आहे. या बाबतींत अनेक शास्त्री लोकांचीं व विद्वानांचीं पत्रें आमच्याकडे आलीं असून त्यांत त्यांनीं 'विस्तारां'तून हें अत्यंत महत्त्वाचें भाषांतर देण्यास सुरवात केल्याबद्दल अभिनंदन केलें आहे, त्याबद्दल आम्ही त्यांचे फार आभारी आहों. या पत्रांपैकीं दोन पत्रें खालीं देत आहों.

रा. रा. **मंगेश रामकृष्ण तेलंग** लिहितात:

"आपण **विविधज्ञानविस्ता**राचे आगस्ट ते अक्टोबरचे (१९३३) जोड अंकांत म.म. श्री. वासुदेवशास्त्री यांनीं परिश्रमपूर्व केलेलें पातंजलमहाभाष्याचें मराठी भाषांतर छापून प्रसिद्ध करण्याचा उपक्रम केला आहे तो स्तुत्य व अभिनंदनीय आहे. उत्तम संस्कृत शास्त्रग्रंथांचीं विद्वानांनीं केलेलीं भाषांतरें विद्यारसिकाला प्रिय होतील यांत संशय नाहीं. तरी आपण सदर भाषांतर वि. ज्ञा. वि. मासिकांत क्रमानें संपूर्ण छापून प्रसिद्ध करावें अशी विनंती करितों. **विविधज्ञानविस्ता**राचे वर्गणीदार विद्याव्यासंगी असल्यामुळें ते या कार्याला अनुमोदन देतीलच. ज्या सत्कार्याचा अव्हेर पुण्यांत कांहीं "विद्वच्छिखामणींनीं" केला तें सत्कार्य **विविधज्ञानविस्तार** मासिकाच्या द्वारें सिद्ध करून सर्व वर्गणीदार त्या मासिकाबरोबर स्वतः आपणही यश संपादन करतील अशी मला उमेद आहे.

नागपूर येथील मॉरिस कॉलेजमधील संस्कृतचे प्रोफेसर रा.रा. **वा. वि. मिराशी** लिहितात:—

"गेल्या जोड अंकांत पातंजलमहाभाष्यासंबंधीं आपली योजना वाचली. या ग्रंथाची स्वतंत्रपणें छापून काढण्याची कांहीं योजना झाल्यास फार उत्तम होईल. पण तसें नच झाल्यास **विस्तारांतून** क्रमशः देण्यास माझी पूर्ण संमति आहे. हा ग्रंथ संस्कृत भाषेंत केवळ अलौकिक आहे, व तो सामान्य वाचकांस दुर्बोध असला, तरी विद्वानांस फार उपयुक्त वाटतो. त्याचें भाषांतर होणें जरूर आहे."

चालू सालीं ज्या लेखकांनीं व कवींनीं 'विस्तारा'स वाङ्मयसहाय्य केलें, त्यांचे आम्ही फार ऋणी आहों. 'विस्तारा'ला ते पुढेंही असेंच प्रेमानें साहाय्य करतील असा आम्हांस भरंवसा आहे. त्याचप्रमाणें 'विस्तारा'च्या जुन्या व नवीन लेखकांनीं 'विस्तारा'स लेखनसहाय्य करावें अशी त्यांस विनंती आहे.

'विविधज्ञानविस्तारा'नें ६४ वर्षांत मराठी भाषेची व वाङ्मयाची केलेली सेवा महशूर आहे. केवळ भारदस्त व उच्च दर्जाच्या वाङ्मयास वाहिलेलें मराठींतील सर्वांत जुनें असें 'विस्तार' हेंच एक मासिक पुस्तक आहे. महाराष्ट्राची ही एक स्पृहणीय वाङ्मयसंस्था आहे, असे उद्गार विद्वानांनीं वारंवार काढले आहेत. परंतु विद्वज्जनांच्या पूर्ण आदारास पात्र होऊनही आर्थिक दृष्ट्या मार्गक्रमण करणें 'विस्तारा'स सालोसाल कठीण जात आहे. मातृभाषेवर प्रेम करणाऱ्या महाराष्ट्रीयांनीं या गोष्टीचा कळकळीनें व आस्थेनें विचार करून 'विस्तारा'ला मदत करावी अशी आमची विनंती आहे.






अनुक्रमणिका




वर्ष ६४ वें नोव्हबर-डिसेंबर १९३३ अंक ११-१२

# थोरले माधवराव पेशवे आणि उत्तरेंतील राजकारण

[ लेखकः—रा. रा. रामचंद्र वामन नाडकर्णी ]

## लेखांक १ ला

पुण्यांतील पेशवेदप्तर-प्रकाशनाचें कार्य संथपणें अव्याहत चालू असून त्यांतून निवडलेल्या कागदाचे ३४ भाग आतांपर्यंत प्रसिद्ध झाले, हें सरकारास व रा. सा. सरदेसायांस भूषणावह आहे. आतांपर्यंत प्रसिद्ध झालेल्या कागदांत अव्वल दर्जाचा नसला, तरी दुय्यम दर्जाचा राजकारणी पत्रव्यवहार बराच प्रसिद्ध झाला आहे. अव्वल दर्जाचा नाहीं म्हणण्याचें कारण एवढेंच कीं, या कागदांत पेशव्यांच्या खाशा स्वाऱ्यांनीं व अव्वल प्रतीच्या सरदारांनीं लिहिलेलीं स्वदस्तुरचीं पत्रें त्या मानानें फार थोडीं प्रसिद्ध झालीं, ही गोष्ट इतिहासाभ्यासकाची निराशा करणारी असली, तरी त्याचा दोष संपादकांकडे नाहीं. हाताला आलेल्या कागदांचें शक्य तों वर्गीकरण करून ते प्रसिद्ध करण्याची जी चिकाटी व व तत्परता संपादकांनीं दाखविली, तिचेंच कौतुक करणें रास्त होईल. संपादकांनीं आपली कामगिरी बजावली, पण संपादकांच्या श्रमांचें चीज करणारे रसिक पुढें आल्यावांचून त्यांच्या श्रमांचें सार्थक होणार नाहीं. आज महाराष्ट्रांतील अव्वल दर्जाची प्रतिभा, शृंगाररसपरिपूर्ण कादंबऱ्या, लघुकथा, प्रेमगीतें व या सर्वांपेक्षां विडंबनकाव्यासारख्या उच्च ललितवाङ्मयाची पैदास करण्यांत गुंतली आहे व त्याचें कौतुक बहुजनसमाजाकडून उत्साहानें होत आहे. अशा प्रसंगीं इतिहासाच्या बाडांतलीं जीर्ण पानें धुंडाळीत राहणाऱ्याचे प्रयत्न हास्यास्पद ठरावे यांत नवल नाहीं! या जुन्या कागदांच्या जीर्ण अस्थि एकाला एक जोडून त्यांतून इतिहासनिष्पत्ति करावयाचा खटाटोप व्यर्थ करतो कोण ? व त्या खटाटोपाचें चीज तरी करणार कोण ? तेव्हां, या बाबतींत प्रयत्न करणारांनीं केवळ स्वतःच्या डोक्यांतलें एक वेड म्हणूनच प्रयत्न करावा. परंतु कसेंही असलें तरी, हा प्रयत्न कोणी तरी करणें जरूर आहे. अव्वल प्रतिभेचे लोक या क्षेत्रांत पाऊल घालीत नाहींत, म्हणून बाकीच्यांनीं स्वस्थ बसण्यांत अर्थ काय ? याच भावनेनें मीं हा पुढील प्रयत्न केला आहे व त्याच दृष्टीच्या वाचकांसाठीं तो आहे.

आज पेशवेदप्तराच्या २९ व्या भागाविषयीं या लेखांत चर्चा करावयाची आहे. या भागांत पानिपतोत्तर उत्तर हिंदुस्थानांतील मराठ्यांच्या राजकारणावर प्रकाश पाडणारा पत्रव्यवहार आलेला आहे. सन १७६१ पासून सन १७७२ पर्यंतच्या बारा वर्षांतले एकंदर २८३ लेख या खंडांत आहेत. प्रसिद्ध होणाऱ्या






अनुक्रमणिका

खंडाच्या यादींत या विषयावरील दुसऱ्या खंडाचा उल्लेख नसल्यामुळें पेशवेदप्तरांत माधवराव पेशव्याच्या काळांतला उत्तर हिंदुस्थानविषयक पत्रव्यवहार एव्हढाच, असें मानण्यास हरकत नाहीं. यापूर्वी कै. राजवाडे, खरे, पारसनीस यांनीं प्रकाशित केलेल्या साधनसामुग्रींत ह्या विषयावरील पत्रें फार थोडीं आहेत. कलकत्त्याच्या इंपीरियल रेकॉर्ड सेरीजमधून ईस्ट इंडिया कंपनीच्या, एतद्देशीय राजेरजवाड्यांबरोबर फार्शी भाषेंत झालेल्या, याच काळांतल्या पत्रव्यवहाराचे पांच खंड छापलेले आहेत व त्यांत या बारा वर्षांतल्या पत्रांची संख्या अजमासें सहा हजार आहे. या दोन्ही संख्यांची तुलना केली म्हणजे सर्वभक्षक काळानें मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनसंपत्तीचा केवढा स्वाहाकार केला आहे, तें कळून येतें. त्याचप्रमाणें हे दोन्ही पत्रव्यवहाराचे खंड बारकाईनें चाळले व परस्परांशीं ताडून पाहिले तर असें बेशक विधान करतां येईल कीं, हिंदुस्थानच्याच काय, पण मराठ्यांच्या राजकारणाचा सर्वांगीण इतिहासही कधींही लिहिला जाणें शक्य नाहीं. कारण तूर्त हे दोन्ही खंड चाळले तर मराठ्यांच्या पत्रव्यवहारांतून मराठ्यांची व इंग्रजांच्या पत्रांतून इंग्रजांची तेवढी बाजू कळून येते, व एकच राजकीय परिस्थिति दोन भिन्न दृष्टिकोणांतून पाहिल्यास कसा फरक पडतो तें दिसून येतें. मग तत्कालीन उत्तर हिंदुस्थानच्या राजकारणांत भाग घेणारे रजपूत, जाट, बुंदेले, शीख, सुजाउद्दौला, काशीचा बळवंतसिंग इत्यादिकांचे राजकारणी पत्रव्यवहार प्रसिद्ध झाल्याखेरीज त्यांची बाजू कशी कळणार, व हें जोंपर्यंत साध्य नाहीं, तोंपर्यंत मराठ्यांच्या राजकारणाचा तरी खरा इतिहास कोठून कळणार ? असो. तूर्त इतक्या खोल पाण्यांत जाण्याची आपणास जरूरी नाहीं. पानिपतानंतर हिंदुस्थानच्या राजकीय पटावर मराठे व इंग्रज हे दोनच प्रतिस्पर्धि आपआपले डाव मांडून होते, तेव्हां या डावांतल्या खेळास कोठून कसा प्रारंभ झाला व कोणी कोणावर कसकशी मात केली, त्याचा इतिहास वाचणेंही कमी मनोरंजक होणार नाहीं. तेव्हां उपलब्ध झालेला पेशवे-पत्रव्यवहार व पर्शियन कॅलेंडरमधील पत्रव्यवहार यांच्या साहाय्यानें या बारा वर्षांतल्या राजकारणाच्या इतिहासाचें अवलोकन करूं.

पानिपतचा घनघोर रणसंग्राम ता. १४ जानेवारी १७६१ रोजीं घडला व त्याच्याच दुसऱ्या दिवशीं या हिंदुस्थान देशाच्या दोन कोंपऱ्यांत पानिपत-संग्रामाच्या मानानें किरकोळ अशा दोन लढाया झाल्या. परंतु क्रांतीच्या दृष्टीनें हे दोन्ही प्रसंग समान महत्त्वाचे आहेत. ता. १५ जानेवारी रोजीं मेजर कार्नेकनें पाटण्यास शहाअलमचा पराभव केला व त्याच दिवशीं पॉंदिचरी येथें कूटनें लालीचा व फ्रेंचांचा पराभव केला. पहिल्या लढाईमुळें पातशाहाचें बाहुलें तात्पुरतें तरी इंग्रजांच्या हातीं आलें व या वेळेपासून त्यांची दृष्टि दिल्लीकडे लागली. पूर्वकिनाऱ्यावर फ्रेंचांचा पराभव होऊन इंग्रजांच्या सत्तेचा पाया दृढ झाला. पानिपतांत मराठ्यांचा पराभव होऊन त्यांच्या उत्तर हिंदुस्थानांतल्या सत्तेचा तात्पुरता उठाव झाला. यामुळें इंग्रजांना उत्तरेंतील राजकारणांत हात शिरकावण्यास संधि सांपडली. यानंतरचा झगडा इंग्रज व मराठे यांच्या दरम्यान पातशाहीचें कागदी बाहुलें हस्तगत करण्याच्या हेतूनें चालू झाला. त्याचें रूपांतर कसकसें होत गेलें तें पाहावयाचें झाल्यास या वेळेपासून दोघांच्याही हालचाली पाहिल्या पाहिजेत. पानिपतच्या संग्रामांत मराठ्यांचा मोठ्या प्रमाणांत संहार झाला, तरी त्यांच्या राष्ट्रीय शक्तीस धक्का बसण्याइतका तो नव्हता; नाना फडणिसाच्या पत्रावरून पानिपतच्या लढाईंत मरण पावलेल्यांचा आंकडा पन्नास हजार ठरतो. या पन्नास हजारांत बरेंचसें सैन्य उत्तर हिंदुस्थानांतील लोकांचें होतें; कारण भाऊ मोहीमेस निघाल्यापासून लढाईच्या कामासाठीं योग्य म्हणून रोहिले, आडारू, चव्हाण इत्यादि जातींचे लोक तो ठेवीत होता. शिवाय बाजारबुणगेंही पुष्कळ कापले गेले. हें वजा केले, तर असें म्हणावयास हरकत नाहीं कीं, मराठ्यांची मनुष्यशक्ति कमी होण्याइतका संहार पानिपतावर झाला नाहीं. कारण तसा तो झाला असता, तर मराठ्यांना आणखी दहाबारा वर्षें तरी डोकें वर करतां आलें नसतें. पानिपतानंतर चारच महिन्यांनीं २९ मे रोजीं निसाजी कृष्ण बिनीवाले यानें लिहिलेल्या पत्रावरून वेळप्रसंगीं पाऊण लाख फौज समरांगणावर





अनुक्रमणिका

उभी करण्याइतकी मराठयांची शक्ति होती, हें दिसून येतें. ( पे. द. २१-२०३ ). भाऊसाहेब, विश्वासराव, जनकोजी, बळवंतराव मेहेंदळे अशा नररत्नांच्या मृत्यूमुळें पानिपतचा संहार भयप्रद वाटला व त्याचीं अतिशयोक्तिपर वर्णनें बखरकारांनीं रचून ठेवलीं. पानिपतामुळें मराठयांच्या मनुष्यबलाला धक्का पोंचला नव्हता व मनांत आणलें असतें तर त्यांना उत्तरेंतील कारभाराची ताबडतोब घडी बसवितां आली असती. ती तशी बसवितां आली नाहीं, याचीं कारणें चिकाटीचा अभाव, दुफळी, गृहकलह व द्रव्याची कमतरता हीं होत. पानिपताच्या वेळीं नारोशंकर दिल्लींत पांच सात हजार फौजेनिशीं होता. तो, पळून आलेल्या मल्हाररावाची व इतर सरदारांची फौज, व नानासाहेब पेशव्याची फौज मिळून ग्वाल्हेरीस एकंदर चाळीस हजार फौज तयार होती. ( राज० ६-४१३ ). या तमाम फौजा दिल्लीच्या रोखें निघाल्या असत्या, व दिल्लीस ठांसून राहाल्या तर दिल्लीचा कारभारही त्याच वेळीं मराठयांच्या हातांत येता. उलटपक्षीं पानिपतावर अबदालीचा विजय झाला,तरी त्याचा नाशही थोडाथोडका झाला नाहीं. तुल्यबल प्रतिस्पर्ध्यांच्या युद्धांत विजयश्रीनें कोणालाही माळ घातली, तरी नुकसान दोघांचेंही सारखेंच होतें,हा धडा अबदाली या वेळीं शिकला. मराठयांचें पाणी त्याला कळून अमर्षपूर्ण पराक्रमी शत्रूविषयीं जो आदर वाटूं लागतो, तोच आदर मराठ्यांविषयीं त्याला वाटूं लागला. पानिपतानंतर ताबडतोब मराठ्यांशीं सख्य करण्याचें त्यानें धोरण ठेवलें व दिल्लीच्या पातशाहीची भाऊसाहेबांनीं केलेली व्यवस्थाच थोडया फरकानें त्यानें कायम ठेवली.

भाऊसाहेबांस मदत करण्याच्या हेतूनें दक्षिणेहून निघालेले नानासाहेब जानेवारी महिन्यांत भेलशास आले. या ठिकाणीं त्यांना पानिपतच्या पराजयाचें वर्तमान समजलें. नानासाहेबाचा प्रथम विचार दिल्लीस जाण्याचा होता. पण सदाशिवरावभाऊच्या बातमीमुळें त्यांची कंबर खचल्यासारखी झाली. ग्वाल्हेरीअलीकडे पछोरापर्यंत नानासाहेब पोंचले, तोंपर्यंत पानिपतावरून पळालेले मल्हारराव होळकर आदि सरदार व दिल्लीहून निघालेला नारोशंकर ग्वालेरीस पोंचले. फेब्रुवारीअखेर ग्वाल्हेर मुक्कामीं तमाम फौजा एकत्र झाल्या; पण मल्हाररावाच्या सल्ल्यामुळें नानासाहेबानें पुढें जाण्याचा बेत रहित केला. इकडे अबदालीनें तहाच्या गोष्टी लावल्या होत्या. त्याचें संकलित वृत्त ता. ६ मेच्या हिंगणेबंधूंच्या पत्रावरून कळून येतें. पेशवेदप्तर भाग २१, ले. २०२, व भाग २, ले. १०३ हे एकाच मजकुराचे गहाळ झालेले दोन बंद आहेत. ते एकत्र करून वाचले पाहिजेत. पानिपतचें झुंज झाल्यावर तीन दिवसांनीं अबदाली दिल्लीस पोंचला व तेथून त्यानें आग्र्याकडे कूच केलें. या वेळीं दिल्लींतील मराठयांचे वकील बापूजी महादेव हिंगणे यानें अबदालीचा वजीर शहावलीखान याच्यामार्फत सलोख्याच्या बोलण्यास सुरवात केली. आपणास परवानगी मिळाल्यास आपण पेशव्याचा व अबदालीचा तह करून देऊं असें हिंगण्यानें आपल्या जबाबदारीवर बोलणें सुरू केलें. अबदालीही निमित्तास टेकला होता असें दिसतें. त्यानें या गोष्टी कबूल केल्या व हिंदुस्थानच्या कारभाराची माहिती असलेला शहावलीखानाचा चुलत भाऊ याकूबअलीखान यास पेशव्याकडे पाठविण्याचें ठरविलें. "मर्जीप्रमाणें हदहदूद सोबत जाऊन ठैरावून कलह परस्परें दूर करवावया व झुंजास आम्ही इच्छीत नव्हतों ये गोष्टींची माजरत (खातरजमा) करावी इतक्या गोष्टी शाहाचे रूबरू करार झाल्या." असें हिंगणे म्हणतो; यावरून अबदाली तहास उत्सुक होता असें दिसतें. हिंदुस्थानांत तैमूरची पातशाही मोडून आपली पातशाही स्थापण्याचीं त्याचीं साम्राज्यसुखस्वप्नें लयास गेलीं. फक्त लाहोर अटक सुभे मात्र त्याला गिळंकृत करावयाचे होते. हिंदुस्थानांत मराठ्यांखेरीज दुसरा प्रबळ प्रतिस्पर्धि आपणास नाहीं, याचीही खात्री त्याला पटली व यामुळें अतःपर तो सलोख्याच्या धोरणासच लागला. मार्च अखेरपर्यंत पेशवा उत्तरेंत होता. या अवधींत अबदालीचे वकील पेशव्याकडे आल्याचा उल्लेख आहे. ( पे.२, १४९ ). पण तहाच्या मुख्य वाटाघाटी मात्र वकीलामार्फत मथुरेस चालू राहिल्या. कारण नानासाहेब दक्षिणेत परतले, व अबदालीच्या मुलुखांत शिखांनीं व इराण्यांनीं दंगा केल्याचें वर्तमान आल्यामुळें तो देखील स्वदेशीं जाण्यास




अनुक्रमणिका

निघाला. ता. १९ मार्च रोजीं तो निघाला. जाते वेळीं तीन दिवस दिल्ली लुटून नेली. दिल्ली ही केवळ फकीर होऊन गेली. ( पे. २,१४२ ). जातांना दिल्लीची पातशाही शहाअलमास, वजिरी गाजुद्दीनास व बक्षीगिरी नजीबखानास अशी व्यवस्था करून गेला. अबदाली गेल्यावर सुरजमल जाट व गाजुद्दीन वजीर मथुरेस आले. या ठिकाणीं होळकरांचे दिवाण गंगोबातात्या यांस बोलावून आणलें व दिल्लीहून याकूबअलीखां व बापूजी महादेव हिंगणे हेही आले. प्रथम गाजुद्दिनास वजिरीचीं वस्त्रें देण्यांत आलीं, व नंतर तहाच्या वाटाघाटीस सुरवात झाली. ह्या वाटाघाटी जूनपर्यंत चालू होत्या व अखेर त्यांतून कांहीं निष्पन्न झालें नाहीं. मराठे, जाट, नजीब, गाजुद्दीन, सुजाउद्दौला सगळेच आपला स्वार्थ पाहत होते. तह करावयाचा तो दक्षिणेंत जाऊन पेशव्यांची गांठ घेऊन करावा, अशी अबदालीची याकूबास सक्त ताकीद होती. उलटपक्षीं तह ठरविण्यासाठीं दक्षिणेंत जाण्याचें कारण नाहीं, मथुरेस देखील करतां येईल, असें गाजुद्दीनाचें व गंगोबातात्याचें बोलणें पडलें. अबदालीनें मराठ्यांशीं तहाचें बोलणें लावलें हें ऐकतांच सुजानें व नजीबखानानेंही आपले वकील मराठ्यांकडे पाठवून अंतर्वेदींतील ठाणीं मराठ्यांच्या स्वाधीन करण्याची आपली तयारी दर्शविली. (एप्रिल-मे). मराठे सरदारांच्या मनांतून गाजुद्दीनखानास दिल्लींत दाखल करून नवा पातशाहा करावा असें होतें. पानिपतचा प्रसंग नजीबखानामुळें ओढवल्या कारणानें नजीबाविषयीं मराठ्यांच्या मनांत अतिशय तिटकारा होता. नजीबखान या वेळीं दिल्लीच्या आसपास राहून पातशहाच्या मुलास-जवानबख्तास हाताशीं धरून दिल्लीचा बंदोबस्त करीत होता. सुरजमल जाटाच्या मनांतून आपला अधिकार चालावा असें होतें. यामुळें कोणाचेंच समाधान न होतां कलहाचें मूळ तुटण्याऐवजीं आणखी वाढीस लागलें व तह करण्यासाठीं आलेला याकूबअलीखां कंटाळून १८ जूनच्या मानानें दिल्लीस परतला. तहाचा समाधानकारक निकाल न लागल्यामुळें सुजा व नजीबखान यांनीं पूर्वीचें बोलणें विसरून अंतर्वेदींत पुनः मराठ्यांना त्रास देण्यास प्रारंभ केला,

मार्चअखेर नानासाहेब दक्षिणेंत जाण्यास निघाले. सिरोंजेहून निघतांना पवारांचे महाल जप्त करण्याचा हुकूम झाला. तेथून ते उज्जनीस आले. २१ मार्चास पेशव्यांचा मुक्काम उज्जनीस होता. तेथें शिंद्याकडील येणें बाकीची वास्तपुस्त करून ६ एप्रिलास स्वारी इंदुरास आली व दुसरे रोजीं कूच बऱ्हाणपुरास केलें. दक्षिणेस गेल्यावर नानासाहेबांनीं होळकरांचे महाल जप्त केले, ह्याचें प्रकरण पुढें पुष्कळ दिवस चालू होतें. याच वेळीं पेशव्यास क्षय रोगानें ग्रासलें व उत्तरोत्तर तो वाढत जाऊन २३ जून रोजीं पर्वतीस या कर्तबगार पेशव्याचें शोचनीय देहावसान झालें. उपलब्ध पत्रव्यवहारावरून अखेरपर्यंत नानासाहेबांची उत्तर हिंदुस्थानांतल्या कारभारावर सक्त नजर होती, असें दिसतें व त्यावरून त्याला भ्रम झाला होता ही गोष्ट शक्य दिसत नाहीं. पेशव्याबरोबर नारोशंकरही दक्षिणेस आले होते, व उत्तरेंत मल्हारराव होळकर, बाळाजी गोविंद, गोपाळराव गणेश व गणेश संभाजी हीच मंडळी राहिली होती. पानपतावर मराठ्यांचा पराभव झाल्याचें समजतांच उत्तर हिंदुस्थानांतील साऱ्या जमीनदारांनीं मराठ्यांविरुद्ध उठून बंडें चालविलीं होतीं. माळवा, बुंदेलखंड व अंतर्वेदी या तीन्हीं ठिकाणीं मराठ्यांच्या सत्तेचा उठाव झाला होता. पैकीं माळव्याची सुभेदारी मराठ्यांकडे असल्यामुळें माळव्याचा प्रथम बंदोबस्त होणें जरूर होतें. ग्वाल्हेरीकडील जाटाचा बंदोबस्त झाल्यावर मल्हारराव होळकर माळव्यांत आले. ( एप्रिल-मे ). प्रथम त्यांनीं रामपुऱ्याचें ठाणें घेऊन कोटेवाल्याचा चाकर अभयसिंग राठोड धूम घालीत होता, त्यास गडी गांगरोणी येथें पकडून गडीस मोर्चे लावले. मराठ्यांचा जुना शत्रु माधोसिंग मराठ्यांविरुद्ध खटपट करीत होताच. या वेळीं पेशव्यानें मल्हाररावास निरनिराळ्या कामगिऱ्या सांगितल्या होत्या. बुंदेलखंडांतील मामलतीची व्यवस्था, माधोसिंगाचें पारिपत्य, उदेपूरच्या राण्याची स्थापना व गाजुद्दीनाकडून काशीप्रयागच्या सनदांची प्राप्ति इतक्या गोष्टींची व्यवस्था मल्हाररावावर सोंपविली होती. यास मल्हाररावानें, " आपणांमध्यें फूटफितूर नसावी. सर्व सरदार व फौजा




अनुक्रमणिका

येकडील असल्यास साहेबाचे मनोदयानुरूप घडोन येईल." असें लिहिलें.२ जूनच्या पत्रांत होळकर लिहितो, "सारांश फौज तूर्त दाहा हजार दसऱ्यापूर्वी रवाना करावी. तरच इकडील बंदोबस्त होऊन स्थित राहील." या पत्रांवरून मराठे सरदारांत आपापसांत बखेडे होते, व लष्करी व्यवस्था मजबुतीची नव्हती, हें दिसून येतें. हा रोग महाराष्ट्राला अखेरपर्यंत लागलेला असल्यामुळें त्याची चर्चाही करण्यांत नावीन्य नाहीं. या वेळीं जनकोजी शिंद्याचा ठावठिकाणा लागला नसल्यामुळें शिंद्याच्या दौलतीवर अद्याप कोणाची नेमणूक झाली नव्हती व उत्तरेंतील जबाबदारी एकट्या होळकरावरच पडली होती. मल्हारराव ग्वाल्हेरीहून माळव्यांत येतांच मागें गोहदवाला, पछोरकर, नरवरकर, जाट जमीदारांनीं धामधुमीस सुरवात केली. यावरून मराठ्यांचा लष्करी बंदोबस्त किती कच्चा होता तें दिसून येतें. 'फौज नाहीं, फौजेस द्यावया पैका नाहीं,' हेंच रडगाणें आढळून येतें. जाटांप्रमाणें बुंदेलखंडांत गव्हारांनींही गर्दी केली होती. हिंदुपत, राजे पहाडसिंग, गुमानखुमानसिंग हे छोटे राजेही डोकें वर काढूं लागले. नानासाहेब पेशव्याबरोबर उत्तरेस आलेला जानोजी भोंसलें बुंदेलखंडाच्या कामगिरीवर होता; पण त्यानें तात्पुरता अंमल बसवून पावसाळ्यामुळें दक्षिणेंत प्रयाण केल्यामुळें पुनः त्या प्रांतांत दंगा सुरू झाला. राघोबादादाचा मेहुणा गोपाळराव गणेश बर्वे पुढें तिकडे गेला; पण त्याच्यानेंही ही कामगिरी रेंटेना. अंतर्वेदींतील ठाणीं हस्तगत करण्याच्या कामगिरीवर गोविंदपंत बुंदेल्याचे मुलगे बाळाजी गोविंद व गंगाधर गोविंद हे होते. त्यांनीं कांहीं ठाणीं सलोख्यानें व कांहीं लढाई करून सोडविलीं ( पे. २९.५,६ ). पण इतक्यांत हाफीज रहमतखानाची फौज येऊन त्यानें सकुराबादचें प्रसिद्ध ठाणें हस्तगत केल्यावर सर्व रोहिले उलटले. झांशीस गुजरांनीं दंगा केला. तात्पर्य, या वर्षी मराठ्यांच्या सत्तेची चोंहों बाजूंनीं उठावणी करणारी बंडाळी सर्वत्र चालू झाली.

दिल्लीच्या पातशाहीची तत्कालीन परिस्थिति व उत्तरेंतील निरनिराळ्या सत्ताधिशांची पातशाही कारभारांत स्वामित्व मिळविण्यासाठीं चाललेली धडपड लक्षांत घेतल्याखेरीज तत्कालीन राजकीय परिस्थितीचें आकलन होणार नाहीं. अठराव्या शतकांतील हिंदुस्थानांत दिल्लीचा पातशाहा हा एक अजबखान्यांतील वस्तु झालेली होती ! सबंध हिंदुस्थानचे बावीस सुभे पातशाहाच्या मालकीचे, पण स्वतः पातशाहा मात्र अन्नास देखील मोताद होता ! तरी पण हें पातशाहाचें बाहुलें हस्तगत करण्यासाठीं साऱ्यांची धडपड चालू राही ! परंपराप्रिय हिंदुस्थानांत बाबराच्या मोंगलवंशांतील दिल्लीची पातशाही नष्ट करण्याचें कोणीही मनांत आणलें नाहीं, व अखेर हें कार्य परसंस्कृतीच्या इंग्रजांच्या हातून घडलें. तोंपर्यंत मराठे, रजपूत, जाट, रोहिले, शीख ह्यांनींही पातशाही अजिबात नष्ट करून त्या जागीं स्वतः आरूढ होण्याची वासना बाळगिली नाहीं. पातशाहाला हातीं धरून त्याच्या नांवावर साऱ्या हिंदुस्थानचा कारभार चालविण्याची हांव मराठ्यांनीं व इतर सत्ताधीशांनीं बाळगिली होती व इंग्रजांनींही सुरवातीस पातशाहीचा हा दर्जा ओळखून त्या अनुरोधानें आपलें राजकारण चालविलें होतें. पानिपतपूर्व दिल्लीच्या राजकारणांत मराठ्यांचा दर्जा फार वाढला होता. पातशाहास गादीवर स्थापण्याचा अगर त्यास पदच्युत करण्याचा अधिकार, त्याचप्रमाणें वजीर, मीरबक्षी हे प्रधान नेमण्याचें मराठ्यांच्या सल्ल्यानें सुरू झाल्यामुळें मराठ्यांचा अधिकार वाढला व त्यामुळें त्यांना शत्रुही उत्पन्न झाले. पानिपतच्या लढाईचें कारण नजीबखान रोहिल्यास नानासाहेब पेशव्याकडून मीरबक्षीगिरीचे अधिकार मिळाले नाहींत व त्यामुळें तो रागावला हेंही एक आहे. बाबरच्या वंशांतील पातशाही नष्ट करून त्या जागीं दुराणी अहमदशहा अबदाली याची पातशहात सुरू करावी असेंही नजीबखानाचें कारस्थान होतें. पण पानिपतच्या घनघोर प्रसंगानें अबदालीचे डोळे उघडून दिल्लीची पातशाही पचविणें जड जाईल अशी खूणगांठ बांधून त्यानें जुनीच व्यवस्था कायम ठेवली. त्यांत मराठ्यांचा दोस्त गाजुद्दीनखान यास वजिरी व शत्रु नजीबखान यास बक्षीगिरी दिली. त्यामुळें पुनः नवे घोटाळे सुरू झाले. पानिपतापूर्वी पेशव्यानें सुरजमल जाटास बक्षी-



गिरी देण्याचें अगोदर अभिवचन दिलें होतें, व पानिपतच्या संग्रामांत ऐन वेळीं सुरजमल मराठ्यांना सोडून आला, त्या अर्थी त्याला मराठ्यांपासून फोडण्यासाठीं अबदालीनेंही बक्षीगिरीचें अभिवचन दिलें असल्याचा संभव आहे. कसेंही असलें तरी, पानिपतोत्तर राजकारणांत दिल्लीच्या पातशाहींत आपणास अधिकार मिळाला नाहीं, याची सुरजमलास चीड आली. १७६१ च्या मे महिन्यांत सुरजमल्लानें आग्र्यास वेढा दिला व तो नजीबाशीं लढूं लागला. यापुढें कैक वर्षें जाट-रोहिल्यांचें युद्ध चालू होतें. त्याच्या बुडाशीं हींच कारणें होतीं. सुरजमल राजकारणी पुरुष होता. नानासाहेव पेशव्यानें देखील " तो मोठा काबू आहे " असे उद्गार काढलेले आहेत. कोणाला विशेष न दुखवितां सर्वांना मायेंत ठेवून वेळप्रसंगीं स्वतः झीज न सोसतां, कोठल्याही राजकारणाची विशेष झळ अंगाला न लावतां चार पैसे बाळगून तो होता. त्याचे लोकही लढवय्ये होते. पानिपतच्या प्रसंगाची झळ त्याला मुळींच लागली नव्हती. यामुळें पानिपतानंतर मराठे, रोहिले, सुजा वगैरे क्षीणबल झाल्यामुळे त्यानें जोर धरला. लाहोर अटक सुभ्यांतले शीखही त्याचे दोस्त होते. यामुळें तो भारी झाला. मराठ्यांचा कलही प्रारंभीं जाटांकडेच होता. आग्र्याच्या वेढ्यांत गंगोबा तात्या दोनचार हजार फौजेनिशीं सुरजमलास मदत करीत होता. नामधारी गाजुद्दीन वजीरही जाटाकडेच होता. तेव्हां हा एक पक्ष झाला. दुसरा पक्ष नजीबखान रोहिल्याचा. अबदाली स्वदेशीं गेला, त्या वेळीं हा सोनपतावर असून दिल्लीच्या आसपासचा मुलुख हस्तगत करीत होता. शहाअलम पातशहा पाटण्यास गेल्यामुळें त्याचा मुलगा जवानबख्त दिल्लींत होता. याच जवानबख्तास भाऊसाहेबांनीं वस्त्रें देऊन पातशाहाजादा बनविलें होतें. यास नजीबानें मायेंत धरून सर्व बंदोबस्त स्वाधीन केला होता. यमुनापारचे रोहिले व जयपूरचा माधोसिंग नजीबाच्या पक्षांतले होते. तिसरा पक्ष सुजाउद्दौल्याचा. अबदालीनें वजिरी गाजुद्दीनास दिल्यामुळें सुजा चिडला होता व पातशहासच हातीं धरल्यावर सर्व कार्य होईल या हेतूनें त्यानें पाटण्यास असलेल्या पातशहास आणण्याचा निश्चय केला व त्याप्रमाणें पातशहास बरोबर घेऊन पुढच्या वर्षी सारा बुंदेलखंड काबीज केला. बुंदेले रजपूत सुजास अनुकूल होते; द्रव्यदृष्ट्या मराठे या वेळीं अगदींच निर्बल झाले होते व दक्षिणेंत निजामाच्या व गृहकलहाच्या धांदलीनें त्यांचें लक्ष पुढें बरींच वर्षें दक्षिणेकडे वेधल्यामुळें उत्तरेंत तूर्त माळव्याखेरीज मराठ्यांना बसण्यास जागा नव्हती. शेवटीं एका पक्षाचें वर्णन करावयाचें राहिलें व तें कलकत्तेकर इंग्रजांचें.

तत्कालीन राजकारणांत इंग्रजांची उमेदवारी लक्षांत घेण्यासारखी आहे, व तिची सुरवात याच वेळेपासून होते. यापूर्वी वंगालच्या दिवाणीचा हक्क क्लाइव्हनें मिळविल्यापासून प्रायः इंग्रजच वंगालचे खरे मालक बनून नामधारी पातशहाचा नामधारी सुभेदार इंग्रजांच्या हातचें बाहुलें बनलेला होता. वास्तविक इंग्रज सुभेदाराच्या वतीनें कारभार करीत व सुभेदार हा पातशाहाचा नोकर. अर्थात् इंग्रज हे पातशहाचे चाकर, पण शहाअलम ज्या वेळीं वंगाल सुभ्यांत यावयास लागला, त्या वेळीं इंग्रजांनीं त्याला अटकाव केला. या वेळीं मीरकासिम वंगालचा सुभेदार होता. पातशाहाला अटकाव सुभेदाराच्या वतीनें करावयाचा व सुभेदाराला काढून टाकतांना पातशाहाच्या नांवाचा उपयोग करावयाचा, अशीं इंग्रजांचीं राजकारणें असत. आपण परके लोक, केवळ व्यापाराकरितां येथें आलों व केवळ स्वसंरक्षणासाठीं आपणाला शस्त्र धारण करावें लागतें, एरव्हीं लढाई करून शांततेची हानि करावी हें आपणांस मुळींच पसंत नाहीं, असा बाणा इंग्रज नेहमीं दाखवीत. ता. १५ जानेवारी रोजीं इंग्रजांनीं पाटण्यास शहाअलमचा पराभव केला हें वर सांगितलेंच आहे. यानंतर त्यानें तहाचें बोलणें लावलें. ८ फेब्रुवारीस मेजर कार्नाकची व शहाअलमची गया मुक्कामीं भेट झाली. या वेळेपर्यंत पानिपतचें वर्तमान शहाच्या कानांवर आलें असावें; कारण त्यानें इंग्रजांची मदत घेऊन दिल्लीस जाण्याची योजना पुढें मांडली. इंग्रजांच्या तोंडाला पाणी सुटलें. या वेळीं बंगालच्या कंपनीचा गव्हर्नर व्हॅन्सिटार्ट हा होता. ता. १५ फेब्रुवारीच्या पत्रांत गव्हर्नर मीरकासिमास लिहितो, "नबाबानें पाटण्यास कार्नेक व मॅक्गायरपाशीं किती फौज लागेल त्याचा



अंदाज काढावा. मद्रासेहून आम्ही पलटणें मागवितों. अशानें हा देश तरी सुखी होईल व नबाबाचीही सत्ता वाढेल." १९ फेब्रुवारीस गव्हर्नरनें शहाअलमास, "दिल्लीचे उमराव कोण-कोणते अनुकूल आहेत तें कळवावें व पैशाची तयारी करावी. आम्ही आपणाबरोबर येण्यास केव्हांही तयार आहों," असें लिहिलें. पण इंग्रजांना अबदालीचें भय वाटत होतें व शहाअलमाला दिल्लीस कितपत पाठिंबा मिळेल, याची त्यांना शंका होती. तेव्हां पाटण्याचा वसूल शहाअलमच्या खर्चास तोडून तूर्त त्याला हाताशीं धरून ठेवावें व दिल्लीस जाण्याची एकदम घाई करूं नये असेंच त्यांनीं ठरविलें. १ मार्च रोजीं गव्हर्नरनें अबदालीस लिहिलेल्या पत्रांत आम्ही शहाअलमच्या आज्ञेप्रमाणें वागत आहों असें म्हणून स्वतःला 'अबदालीचा विश्वासू प्रजाजन' म्हणविलें आहे. फेब्रुवारींत शहाअलम पाटण्यास आला. ५मार्च रोजीं गव्हर्नरनें शहाअलमास लिहिलें, "आपल्या नांवचे शिक्के पाडावयाचे कीं काय, ते शहानशहा अबदालीस व दिल्लीच्या उमरावांस विचारून पाहावें, नाहीं तर ते रागावतील." १८ एप्रिलास गव्हर्नर मीरकासिमास लिहितो, "मद्रासहून इंग्रजी पलटणें येईपर्यंत पातशाहानें पाटण्यास राहावें व त्याची रोजची तैनात चालू राहावी. सुजाउद्दौला व दुसरे पातशाही अमीर उमराव यांच्याशीं करार करून पातशाहाच्या दिल्लीच्या प्रवासासाठीं पैका जमवावा. पातशहा इंग्रजांच्या संरक्षणाखालीं जाणार असला तरच त्याच्या नांवाचा खुतबा पढावा व नांवाचे शिक्के पाडावे. कर्मनाशीपर्यंत थोडेसे युरोपियन व तेलंगी प्यादे द्यावे,पण मेजर यॉर्क,रामनारायण अगर आपली फौज मात्र पाठवूं नये. निघावयाच्या वेळीं दोन लाख रुपये द्यावे." या पत्रावरून स्वल्प खर्चांत मोठ्या लाभाचीं कामें अंगावर घेण्याची इंग्रजी युक्ति दिसून येते. स्वतःस तोशीस न पडतां राजकारणें लढविण्याची कंपनीसरकारची हिकमत होती. या राजकारणाची मराठी कागदांत पुढील माहिती आढळते. ६ मेच्या हिंगणेबंधूंच्या पत्रांत "बंगालेवाल्यानें व फिरंगियानें अलीगोहरास (शहाअलमास) किल्ले पट्टणियांत ठेवलें आहे,या दिवसांत नाजमसी व आलीगौहरसी सलूक जाला आणि अलीगोहरनें कूचही हिंदुस्थानाकडे केलें. फिरंगी सांगाते आहेत." (२-१०३) मागें सांगितल्याप्रमाणें वजिरी न मिळाल्यामुळें चिडलेला सुजाउद्दौला पातशाहास ताब्यांत घेण्यासाठीं पाटण्याच्या रोखें निघाला. सुजा पाटण्याकडे येत आहे हें पाहतांच आपल्या हातांतली शिकार निसटते या भीतीनें इंग्रज जळफळल्यासारखे झाले. ९ मेच्या पत्रांत गव्हर्नरनें मीरकासिमास "सुजा पाटण्यास पातशहास भेटण्यास येणार म्हणतात तर त्याचे दुष्ट हेतु प्रकट होईपर्यंत आमच्या सल्ल्याशिवाय कांहीं चालूं नये," असा इषारा दिला. पातशाहास पाटण्याहून दिल्लीस घेऊन येण्यास सुजानें इंग्रजास लिहिलें होतें;त्यास २६ मे रोजीं गव्हर्नरनें "पावसाळ्यानंतर आम्ही पातशहास दिल्लीस घेऊन येतों, कर्नल कूट यांस पाटण्यास पाठविलें आहे. आपण मात्र आपला सुभा सोडून पाटण्यांत येऊं नये; नाहीं तर गडबड होईल" असें उत्तर पाठविलें. त्याचप्रमाणें क० कूट यास सुजाला पाटण्यांत येऊं न देण्याचे हुकूम सोडले. सुजाच्या बोलण्यावरून पातशाहा दिल्लीस जाण्यास निघाला. कर्मनाशीपर्यंत इंग्रज फौजेनें त्याला पोचविलें. पुढली जबाबदारी सुजावरच त्यांनीं टाकली. तूर्त इंग्रजांनीं या राजकारणांतून आपले हात काढून घेतले. पानिपतावर मराठ्यांचा पराभव झाल्याचें वर्तमान याच सुमारास मुंबईकर इंग्रजांनीं कलकत्तेकरांस कळविलें. तेव्हां १ जूनच्या मीरकासिमास लिहिलेल्या पत्रांत गव्हर्नरनें "आतां मराठ्यांची सत्ता कमी होत जाईल" असा आनंद व्यक्त केला आहे, त्यावरून इंग्रजांचा मनोदय कळून येतो.

पातशाहास घेऊन येण्यासाठीं सुजाउद्दौला लखनौहून काशीच्या रोखें निघाला. इकडून पातशाहानें मे महिन्यांतच पाटण्याहून प्रयाण केलें. लखनौ मुक्कामीं प्रयागचा सुभेदार मिर्झा कोचक याला सुजानें कैद करून बरोबर घेतलें होतें. त्याला कत्याच्या मुलाला वाटेंत त्यानें ठार मारलें. त्यामुळें सुजाचा व पातशाहाचा थोडा बेबनाव आला होता.( पे. द. २१. २०६. ). २४ जूनला शहाअलमास घेऊन सुजा काशीस आला. यानंतर बरसातीमुळें सर्व मंडळी आपापल्या जागीं स्वस्थ होती असें दिसतें. पावसाळा आटोपतांच पहिला लढाईचा तडाखा माळव्यांत उडाला. माळव्यांत मराठ्यांचा




अनुक्रमणिका

जुना शत्रु जयपूरकर माधोसिंग मराठयांविरूद्ध नजीब-खानाशीं कांहीं राजकारणें करीत होता व माळव्यांतून मराठयांचा अंमल उठविण्याची खटपट करीत होता. १३ नोव्हेंबरचें मराठयांचें वातमीपत्र "राजे माधोसिंग यांणीं नेणव्यास मोर्चे लावून माळव्यांतील अंमल उठवावा म्हणोन फौजसुद्धां चमेलीवर आला. त्याचें पारपत्य न करावें तरी माळवा राहाणार नाहीं या-करितां सुभेदार ( मल्हारराव होळकर ) दरमजल कूच करून मुकुंदवारीस आले. पुढें रा. गंगाधर येशवंत सडे फौजेनिसीं रवाना केले आहेत. आठापंधरा दिवसांत राजे माधोसिंग जैनगरास गेला तरी उत्तम, नाहीं तर युद्धप्रसंग होईल. परंतु यापाशीं फौज थोडी आहे. देशी लोक नालबंदी घेऊन गेले, ते आले नाहींत. शिंद्या-कडील खानाजी जाधव वगैरे दोन हजार आहेत ते उजनीस आहेत. अद्याप वर पोंहोंचले नाहींत. येक सुभे-दाराची हिंमत व स्वामीच्या पुण्य प्रतापेंकरून शत्रूचा पराभव होईल " ( पे. २९. ). पुढें मल्हाररावानें कोटेकरांची मदत घेऊन माधोसिंगाविरुद्ध एक जोराची लढाई ता० ३० नोव्हेंबर रोजीं दिली. पानिपतानंतर मराठयांनीं पहिला पराक्रम याच लढाईंत दाखविला असावा, असें चिंतो कृष्णाच्या पत्रावरून दिसून येतें. "माधोसिंग याची फौज राजसिंग घोडचढा व भनीराम व नंदलाल दिवाण व सुरतसिंग शिवब्रह्मपोता ऐसे तोफखना-हेकले व सुरतनाळू जिजाला व बाणाचे उंठ यैसें जुंजाचे सामानासी हाडोती प्रांतांचीं ठाणीं उठविलीं. धुम फारच केला. ऐसें जाणोन राजश्री मल्हा-रजी होळकर आम्हास घेऊन निघाले. कूच दरकूच कोटे प्रांतांत बारियासीं आलों. आखेराम कोटेकर तोही शामील जाला. दरकुच मांगरोळ प्रांत हाडोती येथें गांठ घातली. छ. १ जमादिलावल च्यार घटका रात्र पावेतों मोळागोळीचें युध्य झालें. उपरांत रात्र जाली. तैसेच घेरा घालून कंबरा बांधून घोडयावर, च्यार प्रहर रात्र उभेच राहिलों. छ. २ जमादिलौवलीं (३० नोव्हें-बर १७६१ ) जुंज प्रातःकाळपासून अस्तमानपावेतों झालें. कछव्याची तमाम फौज बुडविली. लुटून पस्त केलें. मोठेमोठे पटाईत कछव्याकडील कामास आले, मोठें यश स्वामीस आलें. तमाम हिंदुस्थानांत नक्ष बसला. राजेश्री मल्हारजीबावास डाव्या हाताच्या मणगटास गोळीची जखम लागली. चाटून गेली. हालखी जखम असे. ईश्वरें खैर केली. " ( पे. दा २.५ ). दुर्दैवानें या लढाईपासून मराठयांना कांहींच फायदा झालेला दिसत नाहीं. गोळीच्या जखमेमुळें मल्हारराव पुढें बरेच दिवस आजारी होता. "सुभेदारास आजपावेतों आरोग्य नाहीं. वहुत क्षीण. तीन महिने स्नान नाहीं. शरीर बहुत तुटलें. " असा २८ फेब्रुवारीच्या बातमीपत्रांत उल्लेख आहे. माळव्यांतील लढाईच्या पूर्वीच राघोबादादा मल्हाररावास दक्षिणेंत बोलावीत होता. त्याप्रमाणें १७६२ च्या आरंभींच होळकर दक्षिणेंत आले व पुनः उत्तरेस मराठयांच्या कारभारांत अंदाधुंदी माजली.

१७६१ च्या जून महिन्यांत सुजा पातशाहास घेऊन काशीस आला हें वर सांगितलेंच आहे. पावसाळा आटोपल्यानंतर पातशाहास घेऊन दिल्लीस जाण्याचा त्याचा विचार होता. १७ नोव्हेंबरच्या मराठयांच्या पत्रांत " पातशाहा आजपावेतों जाजमऊजवळ होते. आतां कूच केलें. काल्पीजवळ उतरणार, दिल्लीकडे जाणर हे वदंता आहे. सुजाउद्दौलानें सर्व आपली सामुग्री लख-नौहून काहाडली. प्रयागचे किलियांत नेऊन ठेवली, आपण समागमें पातशाहाचे दिल्लीस जाणार. " ( पे. द. २९.२३ ). बुंदेलखंडांतल्या जमीनदारांनीं काल्पीच्या घाटानें उतरून बुंदेलखंडांत आपला अंमल बसवावा, अशी पातशाहास विनंती केली होती. जानेवारी १७६२ मध्यें सुजा व पातशाहा यमुना उतरून काल्पीस आले. उत्तरेंत होळकर नाहीं ही संधि साधून सुजानें बुंदेलखंडांतील मराठयांचीं सारीं ठाणीं उठविलीं. यांत मराठयांतीलच कित्येक राष्ट्रद्रोही घरभेदे सामील झाले. गणेश संभाजी खांडेकर हा कऱ्हाडा ब्राह्मण झांशीचा मामलतदार होता. त्यानें पातशाहास व सुजास पत्रें लिहून किल्ला हवालीं करण्याचीही आपली तयारी आहे असें दाखविलें. झांशी ही माळवा बुंदेल-खंडाचें नाकें असल्यामुळें झांशी गेल्यावर माळवा राहा-णेंही कठीण, अशी मराठयांना चिंता उत्पन्न झाली. शेवटीं मोर्चे लावून सुजानें १ फेब्रुवारी रोजीं झांशीचा किल्ला घेतला. "सुजाउदौला झासीस मोर्चे लाऊन आहे.




अनुक्रमणिका

येथून पाचसा मजलीवर आहे. झांशी घेतल्यावर इकडे तो आला तर टिकाव होणें नाहीं. तमाम जमीदारांचीं सूत्रें त्यांकडे आहेत देखील रोहिले माळव्याचे. यास्तव जर जलदीनें खासा स्वारी अथवा मातबर फौज पुढें रवाना होईल, इकडे येईल तरीच स्थित राहील; नाहीं तर राहिले किले हेहि जातील," असें ता. १ फेब्रुवारीच्या पत्रांत बाळाजी गोविंदानें पेशव्यास लिहिलें, पण त्याचा कांहीं उपयोग नव्हता. नानासाहेब पेशव्याच्या मृत्यूनंतर माधवरावास २० जुलै १७६१ रोजीं पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं. त्यानंतर निजामानें पुण्यावर स्वारी केली. त्यांतून मोकळे होतात तों गृहकलहास प्रारंभ झाला. तेव्हां उत्तरेंतील व्यवस्था करण्याकडे लक्ष देण्यास सवडच होणें शक्य नव्हतें. नानासाहेबाबरोबर उत्तरेंतून आलेल्या नारोशंकरास परत झांशीच्या बंदोबस्तास पाठविण्याचा नानासाहेबाचा हुकूम होता ( पे. द. २१.२०५ ); पण अद्याप नारोशंकर दक्षिणेंतच होता. यावरून मराठ्यांच्या कारभारांतली ढिलाई दिसून येते. झांशी शत्रूच्या स्वाधीन झाल्याचें ऐकतांच २६ फेब्रुवारीच्या पत्रांत नारोशंकर लिहितो, "याउपर सुजातदौलानें लबाडी केली. वरकड पातशाहा व नजीबखान याचे मनांत इतका अर्थ नाहीं. परंतु माधोसिंग रोठोड सुज्यातदौला यानीं लबाडी केली. याचा परिणाम सुधा होणार नाहीं. आम्ही दरमजलीनें मालविया प्रांतें लवकर येतों. परंतु मराठ्यांच्या फौजा उत्तरेंत जाईपर्यंत १७६४ सालअखेर आली. तात्पर्य, मराठ्यांच्या ढिलाईमुळें उत्तरेंतील कारभारांतील यापूर्वीचें त्यांचें वर्चस्व नाहींसें झालें. सुजा व सुरजमल जाट हे दोघेच उत्तरेंत या वेळीं प्रमुख होते. कलकत्तेकर इंग्रज आपल्या जागीं स्वस्थ होते. १७६१ सालअखेर अबदाली अटकेपर्यंत आला होता, पण शिखांच्या दंग्यामुळें तो परत गेला.

सन १७६३ सालांत उत्तर हिंदुस्थानांत मराठ्यांची कामगिरी जवळजवळ कांहींच दिसून येत नाहीं. या सालीं राजकारणाचे वारे बंगालकडून सुरू झाले.बंगाल्यांत मीर कासिमचीं व इंग्रजांचीं भांडणें सुरू होतीं. अखेर प्रकरण निकरावर येऊन मीर कासिमनें एलिस नांवाच्या इंग्रज अंमलदारावर एकदम हल्ला करून त्याच्या फौजेचा पराभव केला व एलिसला ठार मारलें. सुमरू नांवाचा जो फ्रेंच इसम पुढें इतिहासांत प्रसिद्ध झाला, त्याचें साहाय्य घेऊन मीर कासिमनें हें कृत्य केलें. त्यामुळें इंग्रज चिडून जाऊन त्यांनीं ७ जुलै रोजीं मीर कासिमास बंगालच्या सुभ्यावरून काढून त्याच्या जागीं पुनः मीरजाफरला नबाब बनविलें. इंग्रजांनीं ही क्रांति केवळ आपल्या जबाबदारीवर केली व मग त्यासाठीं पातशाहाची मंजुरी मागितली. पातशाहा या वेळीं सुजाच्या हातचें बाहुलें बनलेला होता. सुजानें बुंदेलखंडांतून मराठ्यांचा अंमल घालवून दिल्यानंतर रोहिलखंडांत प्रवेश केला. रोहिल्यांचा बंदोबस्त केल्यावर सुजास अस्मान ठेंगणें झालें. बुंदेलखंडापासून औधप्रयाग काशीपर्यंतचा मुलुख हस्तगत झाल्यामुळें आतां बंगालचाही ग्रास आपणास सहजांत घेण्यास हरकत नाहीं अशा समजुतीनें आम्हीं बंगाल्यांत बंदोबस्तासाठीं येतों अशीं पातशाहाच्या नांवें मीरजाफरास पत्रें गेलीं. ( पार्शि० १-१८५०-५१ ). २८ ऑगस्टच्या पत्रांत गव्हर्नर मीरजाफरास लिहितो, "वजीर व पातशाहा बंगाल्याकडे येत आहेत, म्हणजे आणखी खर्च व नाश मात्र होणार. वजीराचा बंगाल्यावर डोळा आहे. कर्मनाशीनदीवर सैन्य पाठवून त्यांना बंगालमध्यें येण्यास अटकाव करावा"(पार्शि १.१८५५). सप्टेंबर अखेर वजीर पातशहा अलाहाबादेस आले. पाटण्याहून पळालेल्या मीर कासीमानें सुजाला १७ लाख व पातशहाला १० लाख रुपये देऊन बंगालवर स्वारी करण्यास मदत मागितली होती. सुजा बाह्यात्कारें इंग्रजांच्या बाजूनें बोलत होता. मीर कासीम काशीकडे आल्यास आपण त्यास पकडून देऊं असेंही तो लिहीत होता. ( पर्शि० १. १९६१ ). नोव्हेंबरांत सुजा पुनः बुंदेलखंडांत गेला व हिंदुपत राजाच्या कलिंजर किल्ल्यास वेढा घालून होता. मीर कासीम अलाहाबादेला असून त्यानें रोहिल्यांकडे व मराठ्यांकडे मदतीचें मागणें चालविलें होतें. १७६३ अखेर सुरजमल्ल जाटानें दिल्लीवर चढाई करण्यासाठीं स्वारी केली. दिल्लीहून नजीबखान रोहिलाही चालून आला. दिल्लीच्या पूर्वेस सात कोसांवर यमुनानदीच्या एका लहानशा फांटयाला हिंडण नदी असें नांव आहे; तेथें २५ डिसेंबर रोजीं

२



जंगी लढाई होऊन त्यांत सुरमजल जाट मारला गेला व यमुनेच्या पूर्व तीरावरील प्रदेशांत प्रबळ एकछत्री राष्ट्र निर्माण करण्याचे त्याचे प्रयत्न अयशस्वी झाले.

१७६४ साल उजाडलें. या वर्षाच्या सुरवातीस सुजाउद्दौला बुंदेलखंडांतच होता, व मीर कासीम त्याच्या आश्रयास गेला होता. मीर कासीमास आश्रय दिल्यास इंग्रज रागावतील, या समजुतीनें "तो रोहिल्यांकडे अगर दक्षिणेंत मराठ्यांकडे जाणार होता;पण आपण त्याला वळवून काशीस बोलावलें." असें इंग्रजांस सुजानें कळविलें. (पर्शि० १'२०१६–९७). वजीरानें या वेळी इंग्रजांकडे पलटणांची मदत मागितली होती; पण मीर कासीमास प्रायश्चित्त दिल्याखेरीज आपण मदत करणार नाहीं, असें १७ फेब्रुवारीच्या पत्रांत गव्हर्नरनें पातशहास कळविलें. मराठी बातमीपत्रांत या विषयावर पुढील हकीकत आढळते:-"जाफर महंमदखान सुभा बंगालचा, त्याची फौज व फिरंगी व प्यादे तेलंगी वगैरे मिळोन वीस हजार पटणाहून अलिकडे पन्नास कोस श्रीकाशीहून पंचवीस तीस कोस मोहणिया जागा आहे तेथें पडली आहे. मीर कासम अलीखान सुभा बंगालचा होता तो पलोन सुजावदौला व अलीगोहर (पातशाहा शहाअलम) यांजपाशीं आला. जगतशेटाचे दोघे पुत्र कैदीत घेऊन आला, दोन हजार स्वार, च्यार पांच हजार प्यादा तेलंगी, हजार फिरंगी, ऐशी फौज व दहा करोडाची मालियत घेऊन आला आहे. कीं वजीर व पातसाह यांची व याचे मार्फत रा. मल्हारराऊ होळकर व सिंदे वगैरे फौज दक्षणियांची करारमदार करून तिकडे घेऊन जाऊन मीरजाफर अलीखानाचे पारपत्य करून बंगालाचा बंदोबस्त करावा या येरादावर कासम अलीखान वजीराकडे आला आहे. त्यासी तूर्त बुंदेले याचे पारपत्याकरितां अलीगोहर व वजीर व कासमअलीखान ऐसे मिळोन कालंवरगडास येऊन मोरचे लाविलेत. बुंदेलाचे मुलुखांत मोंगलाई अंमल बसविला. फौज तीस चाळीस हजार आहे. बुंदले फार दिक जाले आहेत." (पे. द. २९.५२ ).* पुढें मीरकासीमाच्या मध्यस्थीनें तह होऊन हा वेढा उठला व सुजा, पातशाहा व मीरकासिम त्रिवर्ग बंगालच्या स्वारीवर निघाले. सुमा बंगालवर येत आहे हें पाहतांच इंग्रजांनींही लढाईची तयारी चालविली. ११ मार्च रोजीं गव्हर्नर मीरजाफरास लिहितो, " सुजा बंगालवर स्वारी करणार असला, तर आपणाला त्याच्याच मुलुखांत जाऊन लढाई दिली पाहिजे. याकरितां कॅ. पेबंल व कमोडीर टिंकर यांच्या हाताखालचीं मद्रासचीं पलटणें परत जात होतीं तीं बोलाविलीं आहेत." २१ मार्चचें पत्र "सुजा व पातशाहा बंगालवर आले, तर तीन मार्गांनीं येणार.काशीहून कर्मनाशी नदीवर गाझीपुराहून बक्सार येथें, सरकारशरणवरून छप्याकडे. तीन्ही ठिकाणीं फौजा पाठविल्या तर फौज कमकुवत होईल, करितां आपल्याजवळची फौज प्रचंड असल्याबद्दलच्या अफवा उठवाव्या." या वेळच्या पत्रांवरून इंग्रजांचे लष्करी डावपेंच दिसून येतात. २८ एप्रिल रोजीं गव्हर्नर सुजास लिहितो, "आपण आमचा विश्वासघात केला. इंग्रज जसा दुसऱ्यांना दुखवणार नाहीं, तसा त्यांनाही कोणी दुखवण्यास धजणार नाहीं. पातशाहाला सिंहासनावर आम्ही बसवूं." इकडून सुजानेंही गव्हर्नरनें बंगाल-बहारवरील आपला तावा सोडून द्यावा, नाहीं तर लढाईस सज्ज व्हावें अशी धमकी दिली. मे महिन्यांत सुजा पाटण्याअलीकडे तीन कोसांवर आला. इकडून इंग्रजांचा सेनापति मेजर कॅार्नक चालून गेला. ३ मे रोजीं सुजा, त्याचा दिवाण वेणीबहादुर, मीर कासीम, सुमरू, हिंमतगीर गोसावी वगैरेंच्या फौजांनीं पच्छापहार मुक्कामीं कार्नकवर हल्ला केला. सकाळीं आठ वाजल्यापासून सूर्यास्तापर्यंत लढाई चालू होती. अखेर सुजाचा पूर्ण पराभव झाला व तो फुलवारीस पळाला. शत्रूंच्या तोफा मेजर कॅार्नकच्या हातीं लागल्या. या लढाईंत वेणीबहादूर आणि हिंमतगीर जखमी झाले ( पर्शि.१-२२३२ ) उत्तरेंत एतद्देशीयांच्या मोठ्या जमावाविरुद्ध लढण्याचा हाच प्रसंग पहिला असून त्यांत पराकाष्ठेचें यश मिळाल्यामुळें इंग्रजांना विलक्षण आत्मविश्वास वाटूं लागला व त्या धुंदींत सुजाकडून आलेलीं सारीं तहाचीं बोलणीं त्यांनीं धुडकावून दिलीं. पावसाळाभर तहाचीं बोलणीं व राजकारणें चालू होतीं. औधची सुभेदारी देण्याच्या

*या लेखावर तारीख १७६५ ची दिली आहे ती चूक असून १७६४ पाहिजे. पाहा Elliott-"History of India" vol. VIII, Pages 215-16.






अनुक्रमणिका

लालुचीनें वजीराकडचे कित्येक मोंगल सरदार इंग्रजांनीं फोडले. सुजाच्या फौजा काशीच्या पूर्वेस तीस कोसांवर भागीरथी नदीच्या कांठीं बक्सार येथें पावसाळ्यांत छावणी करून होत्या. त्याच्यावर पावसाळ्यांत पाटण्याहून मेजर मनरोनें चाल करून हल्ला केला. २३ आक्टोबर रोजीं जंगी लढाई होऊन त्यांत सुजाचा पूर्ण पराभव झाला, व तो एका दुराणी घोड्यावर बसून पळाला. चारपांच हजार सैन्य शोणभद्रांत बुडून गेलें. तोफा, तंबू, घोडे, उंट, हत्ती वगैरे बरीच लूट मनरोच्या हातीं लागली. (पर्शि. १-२४५३). बक्सारच्या लढाईचें वर्णन मराठ्यांच्या बातमीपत्रांत पुढीलप्रमाणें आहे:—"पातशहा व सुज्यातदौले फौजेसुद्धां पटण्याअलिकडे पस्तीस कोस जाऊन मुक्काम केला. पटणियाकडून फिरंगी आले. अगोदर जाबसाल सलुकाचा फिरंगियांनी लाविला होता, त्याचा मातबर माणूस पातशाहपाशीं आला कीं मुलाजमतीस येतात; मामलत करूं त्यावरून सुज्यातदौले यांनीं विचार केला की फिरंगी हरामजादे आहेत, भरवसा नाहीं, म्हणोन पातशहा व बुणगे ऐसे माघे ठेऊन बारा कोस आणिक पुढें पंचवीस तीस हजार फौजेनिसीं आले. पहिला प्रहर पावेतों सलुखांची गोष्ट मात होती. कोसा दो कोसाचें अंतर राहिलें होतें. तेथेंच लढाई मातबर सुरू झाली. तरवारी तरवार जाली. संध्याकाळ जाला. फिरंगियाकडील तीन हजार माणूस ठार झाले व धरले आले. जखमी बहुत जाले. राहिले ते पळोन गेले. सड्या फौजेचें बुणगें मागें होतें, त्यावर माघारे दुसरे टोळी फिरंगियांची येऊन पडली. बुणगे लुटले. मागती युद्ध जाले. सुज्यातदौलाकडील शुज्याकुलीखान व वेणीबहादर याकडील गुलाम कादरखान ऐसे दोघे सरदार ठार झाले. रात्र बहुत जाली. शुज्यातदौले फौजेसुद्धां शिकस्त खाऊन माघार निघोन कूच दरकूच येत होते तो सुवर्णभद्रात दाहाबारा हजार माणूस बुडोन मेले. वस्तभाव गेली. आतां राहिली फौज घेऊन वाराणसीस दाखल जाले. बुणगें व पातशाह मागे होते तेहि मागून येतात. फिरंगी जेथें होते तेथेंच आहेत." या लढाईतील विजयामुळें इंग्रजांना चेव आला, व ते पुढें पुढें आक्रमण करूं लागले. मौज ही कीं, ज्या पातशाहासाठीं सुजानें एवढी खटपट केली तो पातशाहाच सुजाचा पराभव होतांच त्याच्यावर उलटला. बक्सारच्या लढाईनंतर दोघेही काशीस आले. तेथून पातशाहानें इंग्रजांस लिहिलें, "वजीराचा पराभव झाला तें योग्यच झालें. त्याच्या कर्माचें त्याला प्रायश्चित्त मिळालें. हा विजय इंग्रजांचा नसून माझाच होय असें मी समजतों. माझा दिल्लीला जाण्याचा विचार होता, पण आतां आपल्या कृपाछत्राखालीं बनारसलाच राहणार. मात्र दिल्लीला जाण्यांत आतां विलंब लावून उपयोग नाहीं. जोराचें लष्कर माझ्या मदतीस यावें." (पर्शि. १. २४६७,२४८५). इंग्रजांना आपलीं राजकारणें चालविण्यास एतद्देशीयांची मनोभूमिका किती भुसभुशीत मिळाली, तें यावरून दिसून येतें. बक्सारच्या लढाईनंतर उत्तरेंतील सारे जमीनदार इंग्रजांची हांजीहांजी करूं लागले. यापूर्वीं राजकीय क्षेत्रांत मराठ्यांचें जें वजन होतें, तें इंग्रजांकडे जाऊं लागलें. खुद्द सुजाही टेकीस आला व त्यानें डिसेंबरांत इंग्रजांकडे पुनः सलोख्याचीं बोलणीं लावलीं. "माझ्या कमनशिबामुळें मीर कासीमच्या नादीं लागून मीं आपल्या उपदेशाकडे लक्ष दिलें नाहीं. पण आतां आपल्या पराक्रमाची खात्री झाली; आतां आपण असा तह करूंया कीं, जो "शिकंदराच्या भिंतीप्रमाणें अभेद्य राहील" असें त्यानें एका पत्रांत लिहिलें. (पर्शि० १. २५१६). पण विजयोन्मत्त इंग्रजांना ह्या वेळीं शिकंदराच्या भिंतीची जरूरी नव्हती व त्यांनीं सुजाच्या विनवण्यांना धुडकावून दिलें.

बक्सारच्या लढाईपूर्वींच मराठ्यांच्या फौजा उत्तरेंत पोंचल्या होत्या. सप्टेंबरांत मल्हारराव होळकर माळव्यांत होते. शिंद्याच्या दौलतींत भानगडी होत्या. राघोबादादानें महादजी शिंद्याची सरदारी काढून ती मानाजीच्या नांवें केल्यामुळें महादजी संतापून उत्तरेंत आला व तो या वेळीं कोणत्याही कारभारांत लक्ष घालीत नव्हता. मराठ्यांपुढें या वेळीं जाटांचें राजकारण उपस्थित झालें होतें. सुरजमल जाटाचा पुत्र जवाहिरसिंग यानें बापाच्या मृत्यूचा सूड उगविण्यासाठीं नजीबखान रोहिल्यावर स्वारी केली. जाट व नजीबखां यांच्या युद्धांत जाटाचें साहित्य करावें असे पेशव्यांचे हुकूम होते. (पे. २९.७२). त्याप्रमाणें




अनुक्रमणिका

मल्हारराव आपली फौज घेऊन जाटाच्या मदतीस निघाला. सप्टेंबरांत जवाहिरसिंगानें बलमगडाची उत्तम मजबुती केली, व फौज व तोफखाना घेऊन तो फ़रिदाबादेस आला. तेथें तळ्यावर स्नान करून फरिदाबादेस उजवे टाकून यमुनातीरावर येऊन उतरला ( पे. द. २९. ७३ ). नजीबखांला हें वर्तमान समजतांच तोही निघाला. त्याच्याकडेही तीस चाळीस हजार फौज होती. १५ नोव्हेंबर रोजीं एक जंगी लढाई झाली व तींत नजीबखानाची दाणादाण उडून तो दिल्लींत गेला. १७ नोव्हेंबर रोजीं शहादरा लुटून जवाहीरनें दिल्लीस वेढा घातला. तीन महिने लढाई चालू होती. ४ फेब्रुवारी रोजीं शेवटची लढाई झाली आणि तींत नजीबखानाचा पूर्ण पराभव झाला. या वेळीं नजीबखानाचा समूळ निःपात करण्याची उत्कृष्ट संधि आली होती; पण पुनः मल्हाररावाच्या मध्यस्थीनें जाटाला नजीबाच्या तहाच्या बोलण्याला मान्यता द्यावी लागली. या तहाला जवाहीर मनांतून अनुकूल नसल्यामुळें त्याचें व मराठ्यांचें वांकडें आलें. मल्हाररावाला नजीबाबद्दल असा वारंवार पान्हा कां फुटे तें समजत नाहीं; पण मुसलमानांविरुद्ध लढतांना जाट व मराठे हे हिंदुत्वाचें अगर धर्मबंधुत्वाचें नातें राजकारणापुरतें सोडून देण्यास तयार होत, असेंच या काळाच्या इतिहासावरून दिसून येतें. कदाचित् रोहिल्यास समूळ नष्ट केल्यास जाट प्रबळ होतील, अशीही मराठ्यांना भीति असावी. असो. फेब्रुवारी १७६५ त मल्हारराव जाटाच्या राजकारणांतून मोकळा झाला व सुजाच्या मदतीस गेला तें आतां सांगावयाचें आहे.

बक्सारच्या लढाईत पराभव पावल्यापासून सुजानें इंग्रजांशीं तहाचीं बोलणीं सुरू केलीं, पण कलकत्तेकर त्याचा विचार देखील करीनात ! सुजापासून पातशाहाला अलग करण्याचें कारस्थान दरम्यान इंग्रजांनीं यशस्वी रीतीनें सिद्धीस नेलें. यापुढें सुजाला बंडखोर ठरवून पातशाहाच्या नांवानें त्याला शासन देण्याचा नवा उपक्रम इंग्रजांनीं केला. सुमरू, मीर कासीम व पळालेले युरोपियन यांना आपल्या स्वाधीन केल्यावांचून आम्हीं तह करणार नाहीं, असें इंग्रजांच्या वतीनें मेजर मनरो यानें ८ जानेवारीच्या पत्रांत सुजाला कळविलें. मीरकासीम आपल्याकडे अभ्यागत म्हणून आला आहे, व अभ्यागताला शत्रूच्या स्वाधीन करणें हा आमचा धर्म नाहीं, असें सुजानें उलट कळविलें. आलेल्या संधीचा तडफेनें उपयोग करण्याच्या बाबतींत इंग्रजांचा हातखंडाच आहे. जानेवारी १७६५ मध्यें ताबडतोब इंग्रजी पलटणें मेजर फ्लेचर या सेनापतीच्या हाताखालीं सुजावर निघालीं. जलालपुरास एक लढाई देऊन फ्लेचरनें सुजास औधकडे पळवून लावलें. (पर्शि०१-२५६९). जानपूरचा टापू काबीज करून फ्लेचर इंग्रजी फौजा घेऊन २४ जानेवारीस अलाहाबादेस निघाला व ३१ जानेवारीस पोंचला. ११ फेब्रुवारीस अलहाबादचा किल्ला हस्तगत झाला. इतक्यांत जनरल कार्नकही तेथें दाखल झाला. तात्पर्य, अलाहाबादपासून कलकत्त्यापर्यंतचा सर्व प्रदेश इंग्रजांच्या स्वाधीन झाला; आतां एवढा मोठा ग्रास पचवितां येणें शक्य आहे कीं काय, हा विचार इंग्रजांपुढें उभा राहिला. पातशाहास एकदम झुगारून या सर्व प्रदेशाचें स्वामित्व आपण बळकावण्याची इंग्रजांस एकदम छाती होईना. तेव्हां कांहीं तरी दिखाऊ योजना करणें जरूर होतें. सुजाच्या हाताखालचा एक अंमलदार मिर्झा नजफखान याला इंग्रजांनीं ३०००० रुपये देऊन वश करून ठेवला होता. त्याला बुंदेलखंडांतून बोलावण्यांत आलें व सर्वांच्या विचारानें जनरल कार्नकनें ४ मार्च रोजीं सर्व पातशाही अमीरउमरावांना उद्देशून एक जाहिरनामा काढला.त्यांत सुजाबरोबरील युद्धाचीं कारणें देऊन "इंग्रज शांतताप्रिय आहेत. मुद्दाम होऊन कोणाशीं लढाई मारण्याचा इंग्रजांचा उद्देश नाहीं. केवळ नाइलाजास्तव अन्यायानें आमच्या विरुद्ध झालेल्यांचाच प्रतिकार करण्यांत येतो. इंग्लंडच्या राजाच्या व कंपनीच्या हुकमाप्रमाणें आम्ही पातशाहाची आज्ञा मानण्यास तयार आहों. पातशाहाचे आम्ही नोकर आहों व जे पातशाहाशीं राजनिष्ठ ते आमचे दोस्त आहेत." ( पर्शि. १. २६०९ ). या जाहिरनाम्यानें आपण चालविलेलें युद्ध पातशाहातर्फे आहे असें इंग्रजांनीं भासविलें, व सुजास अराजनिष्ठ ठरविलें. वास्तविक, सुजा पातशाहातर्फे बंगाल्यावर आला असतां तो राजद्रोही ठरून खुद्द पात-





अनुक्रमणिका

शाहाविरुद्ध ज्यांनीं शस्त्र उपसलें ते इंग्रज राजनिष्ठ ठरले! राजकारणांत मौजा दिसतात त्या ह्या! दुर्बळ पातशाहा सर्वस्वी इंग्रजांच्या आधीन असल्यामुळें तो या जाहिरनाम्यामुळें हुरळला असल्यास नवल नाहीं. इकडे सुजानेंही युद्धाची तयारी चालविली व त्यासाठीं त्यानें मराठ्यांकडे धांव घेतली. मल्हारराव नुक्तेच जाटाच्या राजकारणांतून मोकळे झाले होते. तेथून ते अंतर्वेदीच्या बंदोबस्तासाठीं अनूपशहरीं आले. येथें सुजानें त्यांची गांठ घेतली व रोहिल्यांचें साहाय्य मिळविण्यासाठीं तो बरेलीस हाफीज रहमतखानाकडे गेला. रोहिले, मराठे व सुजा या त्रिवर्गीच्या फौजा आपणावर चालून येतात हें कळल्याबरोबर इंग्रजांनीं अलाहाबादेहून कूच केलें. गंगेच्या कांठावरील जाजमहू ठिकाणाहून मल्हाररावाच्या व सुजाच्या फौजा कुऱ्याच्या मैदानांत आल्या, तोंच इंग्रजांनीं त्यांना गांठलें. रोहिल्यांची मदत अखेरपर्यंत सुजास मिळाली नाहींच. मल्हाररावाचा अंगचोरीचा स्वभाव प्रसिद्धच होता. ३ मे रोजीं इंग्रजांच्या तोफांचा मारा सुरू होतांच मल्हारराव गडबडले व थोड्याच वेळांत त्यांनीं पळ काढला! काल्पीस मल्हारराव पोंचले व पाठीमागून इंग्रजांच्या फौजा त्यांचा पाठलाग करीत आल्या. पण दूरवर पाठलाग करण्याचें इंग्रजांस कांहींच कारण नसल्यामुळें ते परत अलाहाबादेस निघाले. अशा रीतीनें सुजाचा हा शेवटचा प्रयत्न अयशस्वी झाला.

मराठ्यांच्या बातमीपत्राप्रमाणें पाहतां या लढाईत मल्हारराव व सुजा मिळून एक लाख फौज होती, व इंग्रजाकडे पांचशें गोरे व दहा हजार देशी फौज होती. (पे.द. २९.९०). शिवाय तोफा होत्या. यावरून देशी फौजेचा विस्कळीतपणा व इंग्रजांच्या कवायती फौजेचा पराक्रम याची कल्पना होते. मूठभर इंग्रज केवळ शिस्तीमुळें या देशांत त्या काळींसुद्धा वचक उत्पन्न करणारे झाले, यांत आश्चर्य नाहीं. फेब्रुवारींत इंग्रज काशीस आले, तेव्हां त्यांनीं पुष्कळ लुटालूट केली (पे. द. २९. ८६); तेव्हां लुटीच्या कामांत इंग्रजी फौजा एतद्देशीयांइतक्याच प्रामाणिक होत्या असें दिसून येतें! असो. यानंतर उघड्या लढाईत इंग्रजांचा पराभव आपल्या हातून होणें शक्य नाहीं असें दिसून आल्यामुळें सुजा इंग्रजांस शरण गेला. प्रथम औधसुभ्यांतले पांच महाल सुजास देऊन बाकी सर्व मुलुख पातशाहाच्या नांवें आपण करून घ्यावा व त्याबद्दल पातशाहास चाळीस लाख रुपये द्यावे असा इंग्रजांचा बेत होता. अशा तऱ्हेनें कलकत्त्यापासून यमुनापावेतों इंग्रजांचा अंमल बसावा व बंगाल्याचे चोवीस लाख व कुरा प्रयाग मिळून सोळा लाख एवढ्या ऐवजावर काम भागावें अशी ही क्लृप्ति होती. पण याच वेळीं लॉर्ड क्लाइव्ह विलायतेहून आला. ३ मे रोजीं क्लाइव्ह कलकत्त्यास आला. या वेळीं ईस्ट इंडिया कंपनीच्या नोकरांविरुद्ध बराच गवगवा झाला होता. कंपनीचे नोकर वाटेल तसा पैसा एतद्देशीय नबाबांकडून उकळून श्रीमंत बनत. बंगालच्या रयतेची एका बाजूनें नबाबांकडून व दुसऱ्या बाजूनें कंपनीच्या नोकरांकडून गांजणूक चाले. बंगाल्यांत कंपनीच्या मालावर जकात माफ असे. त्याचा फायदा घेण्यासाठीं कित्येक खासगी व्यापारी कंपनीच्या नोकरांना लांचलुचपत देऊन त्यांच्यामार्फत कंपनीच्या नांवचीं दस्तकें मिळवून जकात चुकवीत व अशा रीतीनें नबाबाच्या उत्पन्नांत तूट पडे. एतद्देशीयांच्या राजकारणांत ढवळाढवळ करण्यापासून द्रव्यप्राप्ति होते, हें एकदा इंग्रजांच्या ध्यानीं आल्यानंतर त्यांनीं विनाकारण चढाईच्या धोरणाचा (Forward Policy) अवलंब केला होता. या सर्व प्रकरणांचा विलायतेंत गवगवा झाल्यामुळें क्लाइव्हला परत हिंदुस्थानांत पाठविण्यांत आलें होतें. क्लाइव्ह कलकत्यांत आल्याबरोबर त्याला सुजाविरुद्धच्या लढाईची बातमी लागली व एकदम कलकत्ता सोडून यमुनेच्या तीरापर्यंत इंग्रजांनीं धांव मारल्याचें पाहून आपल्या चेल्यांनीं आपणावर ताण केली याचें त्याला कौतुक वाटलें असावें! पण बंगाल-बहारप्रमाणें औधप्रयागचा घांसही एकदम गिळवेल अशी त्याला खात्री नव्हती. उत्तरेंत मराठे, रोहिले, जाट, शीख, मुसलमान सत्ता अद्याप बलवान् असल्यामुळें आपल्या चढाईच्या धोरणाचा संशय येऊन या सत्ता एकवटल्या तर कदाचित् आहे तें देखील जाण्याचा संभव, या दूरदृष्टीनें क्लाइव्हनें एक मजेदार कावा लढविला. बंगाल-बहारच्या शेजारींच सुजाचा औधप्रयाग सुभा असल्यामुळें हा सुभा अजिबात गिळंकृत करण्याऐवजीं तूर्त मित्रत्वाच्या नात्यानें सुजाशीं दोस्तीचा तह करून त्याला





अनुक्रमणिका

बंगालच्या सुभेदाराप्रमाणें नामधारी व निष्प्रभ बनविण्यांत खरी मौज व आपलें कल्याण आहे हें जाणून त्यानें १० जून रोजीं सुजास एक अत्यंत गोड पत्र पाठवून त्याच्या मनांतला किंतु काढून टाकला. याच वेळीं दिल्लीचा एक मुसलमान अमीर महंमदयारखान यानें सुजा, होळकर व आपण मिळून इंग्रजांशीं लढाई देण्याची एक नवी योजना केली होती. या कटांत नागपूरकर भोंसल्यास सामील करून त्याप्रमाणें जानोजी भोंसल्यानें कटक–बालासोर परगण्यांतून कलकत्तेकरांस पायबंद देण्यास त्यानें सुचविलें. पण इंग्रजनिष्ठ जानोजीनें हा सारा पत्रव्यवहार क्लाइव्हकडे पाठवून दिला ( पाशि. १.२६६५--६६ ) आपणाविरुद्ध उत्पन्न होणारें वादळ ओळखून या भांडणाचा सारा कांटाच युक्तीनें काढून टाकावा म्हणून आपल्या अधिकाऱ्यांना दोष देत क्लाइव्ह २५ जून रोजीं कलकत्त्याहून बनारसच्या रोखें निघाला. काशीस सुजाची व पातशाहाची गांठ घेऊन क्लाइव्हनें तहाच्या वाटाघाटीस सुरवात केली. सुजास त्याचे औधप्रयाग सुभे परत देऊन पातशाहास अलाहाबाद व कुऱ्याचा कांहीं भाग दिला. पावसाळा आटोपतांच पातशाहास दिल्लीस नेण्याच्या बाबतींत पलटणाची मदत देण्याचें आश्वासन दिलें. सुजाशीं दोस्तीचा तह करून त्याला प्रसंग पडेल तशी इंग्रजी पलटणांची मदत देण्याचें कबूल केलें. कंपनीला सुजाच्या मुलुखांत व्यापार करण्याची परवानगी मागितली, व सुजानें कंपनीच्या विरुद्ध कोणत्याही राजकारणांत पडूं नये असें त्याजकडून बांधून घेतलें. पातशाहाजवळ व अलाहाबादच्या किल्ल्यांत गोरें सैन्य ठेवलें. अशा तऱ्हेनें सुजाला व पातशाहाला कंपनीचे जवळजवळ मांडलिक बनवून क्लाइव्ह परतला व ६ सप्टेंबरास तो कलकत्त्यास आला. आपला गेलेला मुलुख परत मिळाला, याच समाधानांत सभोंवतीं इंग्रजांचे पाश पडले असतां सुजा दंग झाला ! इंग्रज आपणास लवकरच दिल्लीच्या तख्तावर बसवितील, या आशेंत पातशहा चूर होता.इंग्रजांनीं मल्हाररावाशींही कांहीं तरी तह या वेळीं केला होता.( पे. द. २९.८८ ). अशा तऱ्हेनें आपल्या मोहक राजकारणानें इंग्रजांनीं सर्वांना भुलवून टाकलें. एकदा काबीज केलेला मुलुख इंग्रज परत देतात,याचें त्या वेळीं सर्वांनाच मोठें आश्चर्य वाटलें. मुसलमानावर तर इंग्रजांची अगदींच मोहनी पडली. एक मुसलमान बखरकार म्हणतो, "हिंदी राजांत दोनच सुदैवी होत. एक हमायून व दुसरा सुजाउदौला". कारण दोघांनाही वनवास भोगून पुनः राज्यश्री भोगावयास मिळाली. एका हिंदु बखरकारानें "इंग्रजांचे गुण वानावे तेवढे थोडेच," * असेंच वर्णन केलें आहे. मराठ्याच्या तात्कालीन बातमीपत्रांतूनही " इंग्रज सत्यवादी आहेत " असे उद्गार आढळतात. यावरून क्लाइव्हचें राजकारण किती यशस्वी झालें तें दिसून येतें. सुजाला दोस्त बनवून क्लाइव्हनें बंगालच्या शेजारीं यमुनेपर्यंत उत्कृष्ट तटबंदी केली. त्या बाजूनें परचक्र आलेंच, कीं सुजाला तोंडावर देऊन परस्पर बंदोबस्त करण्यास इंग्रजांस सुलभ गेलें ! शिवाय सुजाच्या संरक्षणाच्या नांवावर इंग्रजी फौजेच्या खर्चास सुजाच जबाबदार ठरे. इंग्रजांनीं हिंदुस्थान हिंदी सैन्याच्या व हिंदी पैशाच्या जोरावर कसें जिंकलें, तें या वेळेपासून पाहणें मोठें उद्बोधक आहे. वेलस्लीच्या तैनाती फौजेच्या कल्पनेचा धागाही क्लाइव्हच्या या राजकारणांत आढळतो.

उत्तरेंत मराठ्यांचे व इंग्रजांचे राजकीय संबंध १७६५ सालापासूनच आले. याच सालांत मराठ्यांची व इंग्रजांची समोरासमोर लढाई होण्याचा प्रसंग आला. तेव्हां इंग्रजांबद्दल अगर त्यांच्या राजकारणाविषयीं मराठ्यांच्या तत्कालीन कल्पना काय होत्या तें पाहाणें मनोरंजक होईल. वास्तविक या काळापर्यंत इंग्रज हिंदुस्थानी लोकांत प्रसिद्ध झाले होते. सुरत, मुंबई, मद्रास, कलकत्ता येथील कंपनीच्या व्यापारामुळें हिंदुस्थानच्या दोन्ही समुद्रकांठांवर इंग्रज प्रसिद्ध होते. मराठ्यांचा व इंग्रजांचा संबंध तर शिवकालापासूनच आलो होता. पुणेकरांना तर जवळच्या मुंबईकर इंग्रजांच्या राजकारणाचा कोंकणपट्टीवरील हर्षामर्षामुळें बाजीरावाच्या वेळेपासूनच चांगला परिचय होता. तेव्हां मराठ्यांना इंग्रज म्हणजे एक कोडें अगर नावीन्य असें या वेळीं वाटण्याचें कांहीं कारण नव्हतें. परंतु मुंबईकरांत व कलकत्तेकरांत एक फरक होता. मुंबईकर

* Elliot. Vol. VIII, page 409.




अनुक्रमणिका

अद्याप केवळ व्यापारी होते व मराठ्यांच्या जागरूकतेमुळें अद्याप त्यांना त्यांच्या अंतःस्थ राजकारणांत हात घालावयास मिळाला नव्हता. राजकीय दृष्ट्या मुंबईकर इंग्रजांना या वेळीं कांहीं महत्त्व नव्हतें; तसा कलकत्तेकरांचा प्रकार नव्हता.बंगालची दिवाणी क्लाइव्हनें मिळविल्यापासून बंगाल-बहार हे सुभे इंग्रजांचेच झाले होते. तेव्हां मीरजाफर अगर मीर कासीम हे नामधारी नबाब बाजूस राहून इंग्रजच या प्रांताचे सुभेदार म्हणून गणले जात; उत्तरेंत मराठे माळव्याचे सुभेदार होते. बाकी पानिपतानंतर पाय टेकण्यास त्यांना जागा नव्हती. तेव्हां उत्तरेंत या दोन सत्ता या काळीं एकमेकांना वचकून होत्या. १७६५ सालीं क्लाइव्हनें दाखविलेल्या राजकारणी चातुर्यामुळें मराठ्यांना अंतर्वेदीपलीकडे जाण्यास जागा राहिली नाहीं व हरप्रयत्न करूनही त्यांना सुजा व इंग्रज यांची कोंडी फोडतां आली नाहीं. पुढें पातशाहाला इंग्रजांच्या हातांतून काढून दिल्लीला नेण्याचें श्रेय त्यांना पटकावतां आलें, तरी त्यापासून लभ्यांश कांहीं झाला नाहीं. तात्पर्य, या काळापासून इंग्रज व मराठे यांचे परस्पर संबंध उत्तरेंत सुरू झाले, त्याचें वर्णन करावयाचें आहे. बंगालमधील इंग्रजांचें राजकीय वर्चस्व मराठ्यांच्या चांगलेंच लक्षांत आलें होतें व सुजा व पातशाहा ह्यांना इंग्रजांनीं आपल्या हातचीं बाहुलीं बनविलीं हेंही त्यांनीं तेव्हांच ताडलें. यांवरून राजकारणाचें अचुक निदान ठरविण्यांत महाराष्ट्रीयांची बुद्धि तरबेज होती यांत शंका नाहीं.

१७६५ मधील बंगालमधील परिस्थितीचें वर्णन करणारीं पुढील पत्रें वाचलीं म्हणजे इंग्रजांचे कावे मराठ्यांच्या ध्यानांत येऊं लागले होते असें वाटतें. १० फेब्रुवारीचें पत्र " सांप्रत येथील (मूर्शिदाबादचें) वर्तमान तर हेसर्व पटन्यची लढाई फात्ख (?) करून सर्व सईन ठेऊन आपण जरिदा स्वार होऊन तांब्रमुखीन ( इंग्रजांनीं ) बालाऊन पाठविले होत यास्तव हे (मीर जाफर ) मजल दरमजल कलकत्त्यास गेले. ते च्यार महिनेपरयंत राहिले होते. कितीक गोष्टींचा जाबसाले होता. तो सर्व फाइसल केला. बंदोबस्त जाहाला. एक लाखपरयंत रुपये कबूल केले. मग समसुदवला तांब्रमुखी याजपासून बिदा होऊन इलाइतीस गेला. कलकत्त्यांत दुसरा साहेब जाहाला आहे. *येथील अधिपतीचे सर्व मालिक तांत्रभुखी आहेत. हे नांवाचे मात्र धनी आहेत. " ( पे. द. २९.८३ ). जून-जुलैमधील बातमीपत्र–"ग्रयागचे किल्ल्यांत चारसें गोरा आहे. या देसचे माणूस कमी आहे. जेथें नाजूक जागा आहे तेथें आपले जातीचेच माणूस ठेवितो. किल्ल्यात सत्ता दुसरियाची नाहीं. जेणेंप्रमाणें पातशाहास सांगावें तेणेंप्रमाणें करावें. सुज्यातदौला याचे चिरंजीव जाले आहेत. जे इंग्रज सांगेल तेणेंप्रमाणें करावे. दुसरे या प्रांतीं कोणी नाहीं. कलकत्त्यापासून यमुनापावेतों अमेल इंग्रजांचा, मध्यें दुसरा कोणी नाहीं. सुज्यातदौले व मल्हारबा वगैरे सर्व सरदार मिळोन कुन्यास आले. फौज लाख पावेतों होती. तेथें नज्यफअल्लीखान व फिरंगी गोरा पाचसें व या देसीची तीन हजार व तोफा होत्या पांच सात हजार फौज याजप्रमाणें याचा सरंजाम कमी असता लाख फौज मोडली. याजकरितां इंग्रजांस मराठे म्हणजे कांहीं नाहीं असें हावभरी जाला आहे; परंतु बाजतबरसात देशींहून सरंजाम चांगला आणून दिलीस जावे हे आहे. बाजार आवई प्रयाग देणे घेणें हें कठीण आहे. **इंग्रज एक पाऊल जागा साधावी हे करील परंतु देणें हें त्याच्या वस्तु कठीण दिसते.** बंगाल सारा इंग्रजाचे स्वाधीन. सर्व हिकडे याचें. दुसरे काही मध्यें कोणी नाहीं, जे आहे ते याचे स्थापित आहेत." ( पे. द. २९.९० ). क्लाइव्हनें कलकत्त्यास निघण्यापूर्वी पावसाळ्यानंतर आपण दिल्लीस नेण्याची तजवीज करूं असें पातशाहास मधाचें बोट लावून ठेवलें होतें.पण नंतर ते ही गोष्ट हळूहळू लांबणीवर टाकूं लागले. ११ ऑगस्टच्या कलकत्त्यास पोंचलेल्या एका पत्रांत पातशाहानें "येत्या वर्षी दिल्लीस जाण्याचें आपण ठरवितों, पण दरम्यान मल्हारराव कांहीं तरी गडबड करील. मग आमची इकडे वर्षभर धडगत राहणे शक्य नाहीं. रोहिल्यांना आपणाकडे वळवून मराठ्यांना शांत केलें पाहिजे. एक वर्ष आपण स्वस्थ बसाल तर आपला आश्रय केल्याबद्दल आम्हांस पश्चात्ताप होईल" असे उद्गार काढले होते. (पर्शी. १.२६८८).

---

डिसेंबर १७६४ मध्यें व्हॅन्सिटार्ट युरोपला जाऊन जॉन स्पेन्सर कलकत्त्याचा गव्हर्नर आला होता.



पण क्लाइव्हनें अद्याप अनुकूल संधि आलेली नाहीं असें म्हणून पातशहास गप्प बसविलें. क्लाइव्हच्या वायद्यास कंटाळून गेल्यामुळें दिल्लीस जाण्यास उत्सुक झालेल्या पातशाहानें डिसेंबरांत मल्हारराव होळकराकडे संधान बांधलें होतें व त्यासाठीं सैफुद्दीन महंमदखान यास होळकराकडे पाठवून आपणास दिल्लीस पोंचविल्यास कोरा व अलाहाबाद हे परगणे देऊं केले होते. ही गोष्ट क्लाइव्हच्या कानावर गेल्यावर त्यानें रागावून पातशाहास याचा जाब विचारला व त्याच्या नाकदुऱ्या काढतांना पातशाहास पुरे वाट झाली.(पर्शि० १.२७५४). यापुढें इंग्रज आपला बंगाल सांभाळून तूर्त तटस्थ होते. वजीराला आपल्या लगामीं लावून, पातशाहाला चुचकारून, वजीर व पातशाहा यांच्यांत फूट पाडून, मध्यस्थीचा भलेपणा आपण घेऊन सैन्याची अगर पैशाची तोशीस न घेतां इंग्रजांनीं पुढें कांहीं वर्षें आपलीं राजकारणें चालविलीं. बंगालची पातशाहास द्यावयाची खंडणी वेळेवर इंग्रजांनीं कधींच दिली नाहीं. दुष्काळाचीं वगैरे कारणें सांगून ही खंडणी तहकूब करतां करतां पुढें वॉरन हेस्टिंग्जनें अजिबात बंद केली. नागपूरकर भोंसल्यांना द्यावयाची चौथही इंग्रजांनीं अशाच गोड थापा मारीत तहकूब केली. मराठ्यांप्रमाणें विनाकारण खर्चाच्या मोहिमांची जबाबदारी इंग्रजांनीं कधीं पत्करिली नाहीं. यामुळें द्रव्यदृष्ट्या त्यांची परिस्थिति कधींच खालावली नाहीं.

आतां मराठ्यांकडे वळूं. मे १७६५ मध्यें इंग्रजांकडून मल्हाररावचा पराभव झाल्यावर मराठे काल्पीस आले हें वर सांगितलेंच आहे. ऑगस्टांत मल्हारराव दतियास आले. सुजा अखेर इंग्रजांस शरण गेल्यामुळें आतां ह्या राजकारणांत कांहीं अर्थ राहिला नव्हता. २५ ऑगस्टच्या पत्रांत गंगोबातात्या " तूर्त आम्ही इकडे छावणीस आलों. दोनतीन महिने बरसात तोंपावेतों सारा भाव निदर्शनास येईल. त्याप्रमाणें बादजबरसात उपयोगी मनसबियांची योजना होईल असें म्हणतो." ( पे. द. २९.९८ ). यावरून मराठ्यांपुढें नक्की बेत या वेळीं कांहीं नव्हता. इतका वेळ उत्तरेंतील राजकारणांत महादजी शिंदे लक्ष घालीत नव्हता; कारण राघोबानें त्याची सरदारी काढून घेतली होती;पण आतां महादजीनेंही होळकरास मदत करण्याचें ठरविलें. १० ऑगस्टच्या पत्रांत " अतःपर होळकराकडे जात आहें त्यांचा मुक्काम दतियावर आहे. ते आम्ही एकत्र होऊन कित्येक मातबर कामें करावीं हाच अर्थ चित्तांत धरिला आहे. दुसरा प्रकार नाहीं, " असें तो लिहितो; यावरून शिंदेहोळकर एकचित्तानें यापूर्वी वागत नव्हते असें दिसतें. पावसाळ्यानंतर शिंदेहोळकरांनीं एकचित्तानें पुढील कामगिरीस हात घातला. राघोबादादांनीं देखील याच सुमारास दक्षिणेंतून आपण फौजेनिशीं व मातबर तोफखान्यानिशीं उत्तरेस येण्याची द्वाही फिरविली होती, यामुळें मराठ्यांना साहजिक हुरूप आला होता. सुटलेला मुलूख पुनः काबीज करण्याची मराठ्यांची या वेळीं उमेद होती; त्याप्रमाणें प्रथम बुंदेलखंडावर स्वारी झाली. १७६२ सालीं सुजानें झांशीचें ठाणें हस्तगत केल्यावर बुंदेलखंडांतून मराठ्यांचा अंमल बहुतेक उठला होता, तो पुनः मराठ्यांनीं या वेळीं प्रस्थापित केला. झांशी काबीज करून नोव्हेंबरच्या सुमारास दतिया, बोडर्स प्रांतांत अंमल बसवून मराठ्यांनीं गोहदकडे मोर्चा फिरविला. गोहदकर जाट हा मराठ्यांचा जुना हट्टी शत्रु होता, व त्याला वठणीवर आणण्याचें अवघड काम बहुधा दर स्वारींत शिंदेहोळकरांना करावें लागे. दक्षिणेंतून मराठ्यांची मोठी फौज येणार या बातमीनें उत्तरेंतील सारे सत्ताधीश गडबडले होते व साऱ्यांचीं राजकारणें मराठ्यांकडे रुजू झालीं होतीं. या वेळचे मराठ्यांचे मनसबे गंगोबातात्या चंद्रचूडांच्या पत्रावरून चांगले कळून येतात. ( पे. द. २९.११७ ). या वेळीं मराठ्यांपुढें तीन मनसबे होते. पहिला पातशाहास आपल्यापाशीं आणून दिल्लीच्या तख्तावर कायम करावें, मग जाटाकडील व रोहिल्यांकडील खालसा मुलुख सहज सोडवितां येईल, असा त्यांचा बेत होता. इंग्रज आपणास दिल्लीस पोंचवीत नाहींत हें पाहून पातशहानें मल्हाररावाकडे राजकारण लावलें होतें; परंतु तूर्त मराठ्यांकडे पैशाचा तोटा असल्यामुळें ही जबाबदारी अंगावर घेणें जड होतें. दुसरें कार्य अहमदखान बंगष व हाफीज रहमतखान रोहिल्यांचें शासन करून अंतर्वेद सोडवावी हें होतें; पण या वेळीं मराठे बुंदेलखंडाची व्यवस्था करण्यांत गुंतले होते. नोव्हेंबर-डिसेंबरांत




अनुक्रमणिका

झांशीसारखीं मोठीं व इतर किरकोळ ठाणीं सोडून मराठ्यांनीं एक कोटीचा मुलुख सोडविला, व जागजागीं आपला अंमल पूर्ववत् बसविला. यामुळें अंतर्वेदींत जाण्यास त्यांना विलंब लागला. शिवाय मराठ्यांना केव्हांही रोख पैशाची गरज जास्त असे, व ज्यांत असा लभ्यांश असेल, अशीं राजकारणें ते प्रथम अंगावर घेत. असें तिसरें राजकारण मराठ्यांपुढें या वेळीं आलें होतें, तें म्हणजे सुरजमल्लाच्या पुत्रांचें भांडण होय. सुरजमल जाटाच्यामागून त्याचा पराक्रमी पुत्र जवाहीरमल्ल गादीवर आला होता व बापाच्या मृत्यूचें निर्यातन करण्यासाठीं त्यानें नजीबाला दिल्लींत वेढा घातला होता, व त्यासाठीं मल्हारराव होळकराची मदत मागितली होती, हें पूर्वीं आलेंच आहे. होळकराच्या मदतीसाठीं जवाहीरनें त्यास बावीस लाख रुपये देण्याचें कबूल केलें होतें; पण युद्धाचा शेवट लावण्याऐवजीं मल्हाररावानें मध्येंच तह केल्यामुळें जवाहीरनें चिडून ही रक्कम देण्याचें नाकारलें, तेव्हां जाटावर स्वारी करणें मल्हाररावास जरूर होतें. परंतु जवाहीर पराक्रमी असून त्यानें आपल्या जाट अनुयायांचें उत्कृष्ट ऐक्य घडवून आणल्यामुळें व लाहोरच्या शिखांशीं त्यानें संघटन केल्यामुळें तो भारी झाला होता. तेव्हां त्याच्यावर लढाई पुकारण्याची अनुकूल संधि येण्याची होळकर वाट पाहत होते. ही संधि आतां प्राप्त झाली होती. सुरजमल्लाचा सर्वांत धाकटा मुलगा नहरसिंग हा भरतपूरच्या गादीच्या वारसासाठीं भांडत असून या वेळीं ढवळपुरास युद्धाची तयारी करीत होता. त्यानें होळकराची मदत मागितली व होळकरानें ताबडतोब रुकार दिला. यापूर्वीं जवाहीरनें जयपूरच्या माधोसिंगच्या मुलखांत धामधूम चालविल्यामुळें माधोसिंगही जवाहीरच्या विरुद्ध झाला होता. शिवाय जवाहीरचा शत्रु नजीबखान हाही या वेळीं मराठ्यांना अनुकूल होणार होता. भावाभावांच्या भांडणांत एका भावाचा पक्ष घेऊन त्याला सैन्याचें साहाय्य देऊन द्रव्यार्जन करणें हें मराठ्यांच्या परराष्ट्रीय राजकारणाचें एक अंग होतेंच. त्याप्रमाणें मल्हाररावानें या वेळीं नहरसिंगाचा पक्ष उचलून जवाहीरशीं लढाई देण्याची तयारी चालविली. नहरसिंगानें आपले कबिले ढवळपुरांत होते, तेथून काढून जयपुरास पाठविले. ( पे. द. २९-१०२ ). १७६६ च्या जानेवारींत मराठे गोहदेकडे होते. इकडे जवाहीरही लढाईची तयारी करूं लागला. आग्र्याचा बंदोबस्त बरोबर करून ढवळपुरावर फौज पाठविण्याची तो तजवीज करतो, तोंच लाहोर सुभ्यांत अबदाली आल्याच्या व त्याचा शिखांनीं पराभव केल्याच्या बातम्या आल्या. त्याबरोबर जवाहीरनें विजयी शिखांशीं संधान बाधलें. शीखसरदार तारासिंग, दसासिंग, शामसिंग हे पंचवीस हजार फौजेनिशीं पानिपताजवळ नजीबखान रोहिल्याशीं युद्धप्रसंग करून व त्याचा पराभव करून दिल्लीकडे आले. (फेब्रवारी १७६६). जवाहीरचें आमंत्रण पोहोंचतांच शिखांची फौज खालीं उतरून खोडी खालसा करून जयपुरापर्यंत धामधूम करीत आली. (पे. द. २९-१२१). तेथून भरतपूरास जाऊन जवाहीरची जाट फौज व शिखांची फौज एकत्र होऊन तमाम फौजा ढवळपुरच्या रोखानें निघाल्या. त्यांस अडविण्यासाठीं मल्हाररावानें तावजी कदम याजबरोबर तीन हजार फौज रवाना केली; पण जाटांच्या तीस हजार फौजेपुढें कदमांचा पाड लागला नाहीं व त्याचा पराभव होऊन शे दोनशें माणूस मारलें गेलें. (फेब्रुवारीअखेर.) कदमाच्या पराभवाची बातमी समजतांच मल्हाररावानें शिंद्याकडील बाजी नरसी व आपणाकडील सुलतानजी लांबहाते या सरदारांबरोबर बारातेरा हजार फौज पाठविली. महादजी शिंद्याचें याच सुमारास ता. ५ मार्च रोजीं लग्न झालें होतें. लग्न उरकतांच स्वतः जाटावर जाण्यास तो निघाला, पण हळदीचें अंग म्हणून मल्हाररावांनीं जाऊं दिलें नाहीं. (पे. द. २९-१२२-१२४). १३ मार्चास एक लढाई होऊन त्यांत मराठ्यांच्या फौजेचा पराभव होऊन फौजा मागें ढवळपुरास आल्या. या लढाईंत सुलतानजी लांबहाते जखमी होऊन शत्रूच्या हातीं सांपडला तो पुढें डिसेंबर अखेर मुक्त झाला. (पे. द. २९ १२६-१२७). मल्हारराव या वेळीं कानाच्या दुखण्यानें अतिशय आजारी होता. तेव्हां गंगोबातात्या व महादजी सर्व सड्या फौजा घेऊन जाटाच्या मुकाबल्यास गेले, ते चमेलीपासून दोनतीन कोसांवर कवारी नदीवर मुक्काम करून राहिले. जाटांची फौज ढवळपुरापासून दोन कोसांवर तोफखान्यानिशीं








अनुक्रमणिका

होती. चमेलीअलीकडे मराठ्यांची फौज असल्यामुळें जाट अलीकडे येईना व शीखही त्यास सोडून गेले. या वेळीं मराठ्यांच्या फौजेनें जाटाची चांगलीच खोडकी जिरवली असती; पण इकडे मल्हाररावाचें दुखणें जास्त विकोपास गेलें व उत्तरेस या वेळीं आलेल्या राघोबानें सरदारांस निकडीचीं बोलावणीं पाठविल्यामुळें मराठी फौजा बहुधा मागें फिरल्या असाव्या. एप्रिलास मल्हाररावाचा मुक्काम झांशीस होता व राघोबा ओरछा सोडून गोहदच्या रोखें चालले होते. ( पे. द. २९--१४० ). बहुधा एप्रिल अखेर मल्हाररावाची व राघोबाची भेट झाली. राघोबानें या वेळीं शिंद्याचे महाल विनाकारण जप्त केले होते; पण शिंदेहोळकर एकचित्त असल्यामुळें राघोबाचें कांहीं चाललें नाहीं. पुढील राजकारणाचे बेत ठरविण्यापूर्वींच मल्हारराव होळकराचें दुखणें विकोपास जाऊन ता. २० मे रोजीं त्याचें देहावसान झालें. मृत्युसमयीं मल्हाररावाचें वय ७३ वर्षांचें होतें. अवघ्या पांच वर्षांपूर्वीं वयाच्या अडसष्ठाव्या वर्षीं त्यानें पानिपतांत भाग घेऊन नंतर माधोसिंगावरील लढाईत जाटांनिशीं लढून गोळीची जखम सोसली होती. यावरून तत्कालीन मराठ्यांच्या जीवनाचा भव्यपणा व भरीवपणा दिसून येतो. राघोबा या वेळीं मल्हाररावास घेऊन जाटांच्या पारिपत्याकरितां जात असतां झांशी प्रांतांतील अलमपुर मुक्कामीं हा प्रकार घडला. यानंतर दादांनीं गोहदेस वेढा दिला, व पावसाळ्यानिमित्त छावणी तेथेंच झाली.

चंबळपासून रावीपर्यंत जाटांचें राष्ट्र बनवून सारा उत्तरहिंदुस्थान मराठ्यांप्रमाणें आपल्या हुकमतींत आणावयाचा असा जवाहीरमलचा बापाप्रमाणें संकल्प होता. शिखांशीं त्यानें ऐक्य केलेंच होतें. माळव्याच्या उत्तरेकडील जाटांशीं एकीकरण करून मराठ्यांना माळव्यांतून हुसकून लावण्याचें नवें धोरण त्यानें पत्करलें व त्यासाठीं गोहदच्या राण्याला मदत करण्याचें त्यानें ठरविलें. १७६६चा पावसाळा उरकतांच आक्टोबरांत राघोबानें पुनः गोहदकराचा वेढा सुरू केला. गोहदकरही निकरानें लढूं लागला व तो हार जाण्याचें चिन्ह दिसेना व इकडे जवाहीरसिंगाच्या फौजाही ढोलपुरास आल्या. शिंदेहोळकरांच्या फौजांना रोजमुरा मिळेना, म्हणून त्याही परतूं लागल्या तेव्हां दादासाहेबांनीं महादजी शिंद्यामार्फत सलोख्याचें बोलणें लावून पंधरा लाखांवर तह करविला. ( नोव्हेंबर). तेथून दादासाहेब जवाहिरसिंगावर निघाले, व चमेलीच्या अलीकडे मुक्काम केला. लढाई करावी तर दुतर्फा खरावी होते, असा पोक्त विचार करून दादांनीं भेदनीतीचा या प्रसंगीं अवलंब केला. जवाहीरचे सरदार अनुपगीर, उमरावगीर व मीरजागीर गोसावी यांना फोडून त्यांच्याकरवीं जवाहीरशीं भेटी व्हाव्या असें ठरलें. पण जवाहीरच्या मनांत दग्याचा संशय येऊन त्यानें अचानक एक दिवस मध्यरात्रीं गोसाव्यावर छापा घातला. " फौज झाडून लुटली. जूज जाहालें. पांचसातशें माणूस पडलें." तिघेही गोसावीबंधु तीनशें स्वारांनिशीं पळून चमेल उतरून दादासाहेबांकडे आले. २३ डिसेंबर रोजीं हा प्रकार घडला. ( पे. द. २९-१६४ ). या प्रकारानंतर जवाहीर भरतपुरास निघून गेला व दादासाहेब केरोलीपाशीं आले. जाटाशीं ही लढाई पुढें चालू राहती; पण इतक्यांत अवदाली अटक ओलांडून हिंदुस्थानांत आल्याचें कळलें तेव्हां ह्या संकटास तोंड देण्यासाठीं दोघांनींही झटपट तह केला. भरतपुरांतले मराठे कैदी जाटानें सोडून द्यावे, जवाहीरनें मल्हाररावास देऊं केलेल्या पैशापैकीं १५ लाख रुपये द्यावे, अशा तहाच्या अटी होत्या. सालीना पांच लाख रुपयांच्या खंडणीवर दादानें माळव्यांतील कांहीं मवासी मुलुख जवाहीरला बहाल केला. अशा तऱ्हेनें जेमतेम तह करून दादानें हें प्रकरण तात्पुरतें मिटविलें. या तहांत अर्थ कांहींच नव्हता, व राघोबाची व अबदालीची पाठ फिरतांच १७६७ च्या पावसाळ्यांत जाटानें तह मोडून पुनः मराठ्यांचीं ठाणीं उठविलीं तो प्रकार पुढें येईल.

१७६६ सालच्या जानेवारी महिन्यापासून ९ डिसेंबरपर्यंतचे पर्शियन कॅलेंडरच्या भागांतील कागद गहाळ असल्यामुळें या सालच्या इंग्रजांच्या हालचाली कळण्यास मार्ग नाहीं.तेव्हां या बाबतींत मराठी कागदांवरच अवलंबून राहिलें पाहिजे. इंग्रजांनीं बहुधा या सालांत विशेष हालचाली केल्या नाहींत. १७६५च्या राजकारणानें क्लाइव्हनें सुजा व प्रतशाहा आपल्या लगामीं लावून ठेवलेले होते. यापुढें त्याचा विचार सुजाचे शेजारीं रोहिले व त्या काळीं प्रबळ होऊं पाहणारा जबाहरसिंग जाट यांना आपल्या




अनुक्रमणिका

पंखाखालीं आणावयाचा होता. अशा तऱ्हेनें इंग्रजांच्या दोस्तांची हद्द माळव्यापर्यंत आणून पुढेंमागें जमल्यास मराठ्यांना शह देण्यास सुलभ पडावें असा त्याचा विचार असावा. १९ ऑगस्ट १७६५ रोजीं त्यानें जवाहीरास एक पत्र लिहून त्यांत सुजा, इंग्लिश कंपनी व पातशहा यांत सख्य झालें, तुम्हींही आमच्याशीं दोस्ती राखण्यांत तुमचा फायदा आहे, असें कळविलें होतें. शिवाय इंग्रजांच्या शत्रूस-सुमरूस जवाहीरनें आपल्याकडून घालवून द्यावें असें सुचविलें होतें. एखाद्या सार्वभौमाप्रमाणें इंग्रजांनीं केलेली ही वर्तणूक जवाहिरास त्या वेळीं आवडली नाहीं व त्यानें इंग्रजांच्या दोस्तीचा विचारही केला नाहीं; पण पुढें व स. १७६६ च्या प्रारंभीं मराठ्यांनीं जेव्हां त्यांच्याविरुद्ध चढाई केली तेव्हां त्यानें इंग्रजांकडे बोलणें लाविलें. ( पे. द. २९१४३ ). पण त्या वेळीं दक्षिणेंत हैदराविरुद्ध कारस्थान उभारलें जाऊन त्यांत इंग्रजांनीं मराठ्यांशीं दोस्तीचा तह केल्यामुळें उत्तरेंत मराठ्यांविरुद्ध जाणें त्याच्या सोयीचें नव्हतें. फक्त रोहिले मात्र अखेरपर्यंत इंग्रजांच्या आहारीं गेले नाहींत. अखेर वॉरन हेस्टिंग्जनें सुजास साहाय्य करून त्यांना उखडून काढलें. असो.

१७६५ चा पावसाळा संपल्यावर क्लाइव्ह आपणास दिल्लीस पोंचवून पातशाहीवर स्थापन करील अशी आशा शहाअलमला वाटत असे. ता. २५ डिसेंबरचें मराठ्यांचें बातमीपत्र, "राजकी वर्तमान. सर्वत्र फिरंगी यांचा अंमल आहे. पातशाहा कडे माणिकपुरीं आहे. गाडदी फिरंगी याकडील तीन हजार आहेत. तुरकस्वार तीन चार हजार आहेत. फिरंगियांचे कैदेंत आहे. श्रीप्रयागीं किल्ल्यांत अंमल फिरंगियांचा आहे. कुरा, ज्याहानाबाद वगैरे येथील मुलूख मात्र पातशाहास फिरंगियाणीं भक्षावयासी दिल्हे, ते घेऊन बाहवल्या-प्रमाणें पातशाहा आहेत. दिलीकडे पातशाहा जाणार म्हणौन अवाई मात्र आहे. पुढें जाऊं देत नाहींत व फिरंगी जाऊं जाऊं मात्र म्हणतातः परंतु इतका जोर नाहीं. सुज्यातदौला अयोध्याप्रांतीं आहे., त्याचे दिवाण वेणीबाहादूर व राजा बळवंतसिंग सर्व फिरंगियांचे दहशतीनें आपल्या जागे धरून बसले आहेत. राजा तरी फिरंगि यांसी पैसे देतो. नबाब आयोद्धेप्रांतीं आहे. बाहेर सर्व फिरंगियांपुढें कांहीं चालत नाहीं. मनांतून स्वामींची इच्छा करितात. फिरंगीखेरीज करून सर्वांचीं सूत्रें सेवकापासीं आलीं आहेत." ( पे. द. २९. १११ ). १७६६ सालीं राघोबा उत्तरेस आला, तेव्हां त्याच्याकडे पातशाहानें आपला वकील पाठविला होता; पण इंग्रजांना त्याचा राग आला. मराठे जाटाच्या प्रकरणांत गुंतल्यामुळें त्यांनाही हें राजकारण अंगावर घेववलें नाहीं. १७६६ एप्रिलांत हाफीज रहमतकडून रोहिल्यांतर्फे पातशाहास आश्वासन गेलें होतें व इंग्रजांच्या नादीं न लागतां आपणाकडे यावें म्हणजे दिल्लीची पातशाहात सहजीं हस्तगत करून देतों असें रोहिल्यांनीं कळविलें होतें ( पे. द. २९.१३८ ). पण इंग्रज नाहीं तर मराठे या दोनच सत्ता आपणास पातशाहीवर बसवूं शकतील, अशी पातशाहास खात्री असल्यामुळें त्यानें रोहिल्यांचा विश्वास केला नाहीं. पावसाळा संपतांच आपण बंगालहून पलटणें आणवूं, असें क्लाइव्हनें आश्वासन दिल्यामुळें पातशाहानें अलाहाबादेस मुक्काम केला. १७६६ साल अखेर वरील प्रकारें उत्तर हिंदुस्थानची स्थिति असतांना अहमदशाहा अबदालीनें पुनः हिंदुस्थानावर स्वारी केली.




अनुक्रमणिका

# सागराचा संदेश

( चाल—आनन्दकंद ऐसा )

आदर्श होय साचा । संदेश सागराचा ॥ धृ. ॥

पडला जसा स्वकर्णी,
घुमतो तसाच अजुनी
कथितों यथार्थ वाचा । संदेश सागराचा ॥ १ ॥

सरिता असंख्य मिळतां,
दिसते न शीग येतां
तोरा नसो धनाचा । संदेश सागराचा ॥ २ ॥

शान्तीस जों धरावें,
निमिषांत भंग पावे
क्षणही तसा सुखाचा । संदेश सागराचा ॥ ३ ॥

भारी तुफान होई,
मर्यादशील तरिही
आघात सोस विधिचा । संदेश सागराचा ॥ ४ ॥

जल-सत्र सिंधु उघडी
लयलूट मेघ मांडी
अर्था परार्थ वेचा । संदेश सागराचा ॥ ५ ॥

नाना तरंग दिसती,
पाणीच सर्व असती
विविधांत एक साचा । संदेश सागराचा ॥ ६ ॥

फेसांत दुग्ध भासे,
निमिषांत फेस नासे
क्रम तोच या जगाचा । संदेश सागराचा ॥ ७ ॥

क्षारोदकें भरावें,
परि मोतिं पाझरावें
निधि होइ सद्गुणांचा । संदेश सागराचा ॥ ८ ॥

सरितात्व कोठ भंगे ?
कोठोनि सिंधु लागे ?
प्रेमांत भेद कैचा । संदेश सागराचा ॥ ९ ॥

चंद्रोदयानुसारी,
सिंधूस ये उभारी
प्रेमा कसा पित्याचा । संदेश सागराचा ॥ १० ॥

तप्तानिलास शीत
उदधी असे करीत
सत्संग या परीचा । संदेश सागराचा ॥ ११ ॥

दावाग्नि आंत ठेवी,
शैत्यास बाह्य दावी
क्रोधांत सौम्य वाचा । संदेश सागराचा ॥ १२ ॥

स्वाती-समुद्र योगें
कंठांत मोतिं वागे
मर्मज्ञ योजकाचा । संदेश सागराचा ॥ १६ ॥

कण नित्य एक पाडी,
खडकांस लाट फोडी
यशशृंग गांठण्याचा । संदेश सागराचा ॥ १४ ॥

शं. ल. गर्गे



# बालकाचें मानसशास्त्र

[ लेखक—रा. रा. त्र्यंबक विनायक मोहरीर ]

## लेखांक ३ रा

### बालकाचें मन व कौटुम्बिक जीवन

मागील लेखांकांत बालकाच्या मनाचें वर्णन केलें आहे. उत्क्रान्ति-तत्त्वाप्रमाणें मनुष्यप्राणी हा इतर प्राण्यांपासून उत्पन्न झाला आहे ही गोष्ट शरीराच्या बाबतींत जशी लागू आहे, तशीच ती मनाच्या बाबतींतही लागू आहे. मनुष्येतर प्राण्यांच्या मनोरचनेंत परिस्थित्यनुरूप फरक पडत जाऊन शेवटीं बालकाचें मन निर्माण झालें आहे. मनुष्य व इतर प्राणी यांच्या शारीरिक स्थित्यंतराला जसें परिस्थिति व आन्तरिक गुणधर्म ही कारणें होत, तसेंच मानसिक स्थित्यंतराला अन्तःप्रेरणा व जीवनकलहांतील धडपड हीं दोन कारणें होत. याप्रमाणें एकदा मनःस्थित्यंतर घडलें म्हणजे विषय आणि इन्द्रियें यांच्या संयोगामुळें प्राप्त होणाऱ्या अनुभवांनीं मनाची वाढ होत जाते. बालकाचें मन व इतर प्राण्यांचें मन हें 'तत्त्व'तः सारखें आहे, म्हणजे दोन्ही मनें विषयाकडे धांवणारी आहेत. परंतु इतर प्राण्यांचीं ज्ञान-कर्मेंन्द्रियें मनुष्यांच्या ज्ञान-कर्मेंन्द्रियांप्रमाणें वाढलेलीं व उन्नत नसल्यामुळें मनुष्येतर प्राण्यांचे विषयेन्द्रियसंयोगजन्य अनुभव श्रेष्ठ व अगदीं बरोबर नसतात. यामुळें बालकाचें मन जसें वृद्धिंगत होत जातें तसें इतर प्राण्यांचें होत नाहीं. विषयाभिमुखप्रवृत्ति हा मनाचा प्रधान गुण असल्यामुळें तो दोहोंतही दिसून येतो, तथापि मनुष्येतर प्राण्यांत इन्द्रियवैगुण्यामुळें त्याच्या मनाची मनुष्याच्या मनाप्रमाणें वाढ होत नाहीं. मनुष्याच्या मनाच्या वाढीला सुरवात बालक जन्माला आल्यावर व्हावयास लागते. बालक जन्मल्याबरोबर, त्याचें मन इतर प्राण्यांच्या मनाप्रमाणेंच असतें. म्हणजे त्या मनांत विषयाकडे धांवण्याची प्रवृत्ति तेवढी असते. या प्रवृत्तीलाच कामवासना अथवा Libido अशी संज्ञा आहे. परंतु जेव्हां मूल हें आपल्या आईबापांना ओळखतें म्हणजे साधारणपणें, मूल चार पांच महिन्याचें झालें असतां बालकाच्या मनांत राग व द्वेष या भावना स्पष्ट जागृत होतात, तेव्हांच आईबद्दल राग म्हणजे आईकडे आकर्षण, बापाबद्दल द्वेष म्हणजे बापापासून विकर्षण, उघडपणें सुरू होतात. त्या वेळींच्या मनाच्या प्रगट स्वरूपाला Odepus Complex म्हणतात, हें मागील लेखांत विशद केलें आहे. आतां या लेखांत Odepus Complex कशी बनत जाते याचा थोडा विचार करून नंतर कौटुम्बिक जीवनांत मनाची वाढ—विशेषतः विकाराची वाढ—कशी होत जाते तें पाहावयाचें आहे.

मनाला स्पर्शसुखाची इच्छा प्रथमपासूनच इतर इंद्रियांच्या सुखापेक्षां जास्त प्रमाणांत असते. गुलाबाचें फुल नुसतें झाडावर पाहून आपलें मन संतुष्ट होणार नाहीं. तें तोडून आपल्या हातीं घ्यावें असें आपणांस वाटतें. तें फक्त श्वास घेण्यासाठींच नव्हे तर त्याच्या कोमल व सुखावह अशा स्पर्शाची आपल्याला इच्छा असते. अथवा बालक हें पाळण्यांत खेळतें हें पाहून आपल्याला विशेष संतोष होत नाहीं, तर तें बालक उचलून व मांडीवर घेऊन त्याला कोमळण्यानें आपल्याला विशेष सुख होतें. यापेक्षांही जरा स्पष्ट उदाहरण घ्यावयाचें म्हणजे, एखाद्या सुंदर स्त्रीच्या अवलोकनानें अथवा तिच्या कर्णमधुर आवाज श्रवण करण्यानें आपल्या मनाची शान्ति होत नाहीं; उलट स्पर्शसुखाची इच्छा तीव्र होत जाते. पण तेंच त्या




अनुक्रमणिका

सुंदर स्त्रीच्या स्पर्शानें व तदनंतर संलग्नानें (संलग्न होण्यांत स्पर्शातिरेक आहे.) आपल्याला स्वर्ग मिळाल्याचा आनंद होतो. सारांश, मनांत स्पर्शसुखाची प्रवृत्ति विशेष आहे. ही प्रवृत्ति विशेष असण्याचें कारण शरीरस्पर्शतः मनें एकत्रित व एकजीव व्हावीं आणि द्वैत नष्ट होऊन अद्वैत-भाव उत्पन्न व्हावा, अशी प्रकृतीची रचनाच आहे. असो; ही स्पर्शसुखाची इच्छा बालक जन्मल्यावरोबरच त्याच्या मनांत उदित होते. मूल हें आपल्या आईला ओळखतें तें स्पर्शज्ञानानें. भूक नसतांना देखील आईनें घेतलें असतां मूल हर्षभरित होतें, याचें कारण स्पर्शसुखेच्छा. आई ही मुलाला आपल्या अंगावरचें दुध पाजते एवढ्यामुळें आई पाहिली किंवा आईनें घेतलें, म्हणजे आनंद होतो असें नव्हे. तशी कल्पना केली तर, अंगावरील दुध पाजणाऱ्या स्त्रिया भिन्न असतांना देखील मुलें हीं आपल्या आईकडेच विशेष आकर्षित कां होतात याची उपपत्ति लागत नाहीं; तसेंच दुध तुटल्यावर देखील मुलें आईच्याच अंगावर विशेष कां असतात हें विशद होत नाहीं. खरोखर बालकाचें मन व तरुणाचें मन हें एकसारखें आहे. फरक इतकाच कीं, बालकाच्या मनाचे व्यापार अज्ञानतः (unconsciously) होत असतात व तरुणाचे मनोव्यापार त्या मानानें ज्ञानतः (consciously) होत असतात. परंतु दोहोंच्या बाबतींत विषय मात्र असतो. मुलाच्या बाबतींत त्याची आई व तरुणाच्या बाबतींत त्याची पत्नी. आया आणि पत्न्या आपल्या मुलांची व पतींची खाण्यापिण्याची व इतर सर्व व्यवस्था करतात एवढ्याचमुळें त्यांच्यांत आकर्षण नसतें, तर परस्परांच्या स्पर्शानें परस्परांना सुख होत असतें हें आकर्षाचें विशेष कारण आहे. याप्रमाणें बालक व तरुण यांचें प्रावृत्तिक साम्य आहे. असो.

बालकाच्या मनांतील स्पर्शसुखेच्छा आईमुळें तृप्त होते म्हणून बालक आईकडे विशेष आकर्षिलेलें असतें. याचा परिणाम असा होतो कीं, तें बापापासून विकर्षित होतें. ज्याप्रमाणें एका रेषेंत तीन पदार्थ असतांना व मधल्या पदार्थाला बाजूचे दोन्ही पदार्थ आपआपल्याकडे ओढीत असतांना, त्या दोन्ही टोकांवरील पदार्थांपैकीं जो पदार्थ मधल्या पदार्थाला विशेष आकर्षित करील तिकडे तो पदार्थ आकर्षित होईल व त्या मानानें दुसऱ्या पदार्थापासून तो पदार्थ अधिक विकर्षित होईल. याचप्रमाणें आई व बाप यांच्या आकर्षणाच्या रेषेंतील मध्यबिंदूवर बालक असल्यामुळें जेव्हां तें आईकडे आकर्षित होतें तेव्हां तें बापापासून विकर्षित होतें. मूल हें आईकडे स्पर्शसुखेच्छेनें आकर्षित होतें, पण त्याची स्पर्शसुखेच्छा कौटुम्बिक जीवनांत बापाच्या अथवा भाऊबहिणीच्या आचरणानें केव्हां केव्हां अपूर्ण राहते, यामुळें त्या स्पर्शसुखेच्छेंतून इतर मनोविकार उत्पन्न होतात. पहिल्या प्रथम बापाच्या आचरणानें ती इच्छा खंडित होते, म्हणून बापाबद्दल द्वेष उत्पन्न होतो. याप्रमाणें भाऊ बहिणी यांचा जन्म होईपर्यंत मुलांत आईबद्दल राग व बापाबद्दल द्वेष असे विकार जागृत होतात. याप्रमाणें Odepus Complex ची उत्पत्ति होते. ही उत्पत्ति किंवा इतर मनोविकारजागृति वयाच्या कोणत्या कोणत्या वेळीं होते हें ठरवितां येऊं शकत नाहीं. याचें कारण विकारजागृति ही शरीरवाढीवर अवलंबून नाहीं! तर ती विषयसंयोगितेवर म्हणजे विषययुक्त परिस्थितीवर अवलंबून आहे. यामुळेंच लहानवयांत देखील उत्तेजनदायक पदार्थ पुढें आले तर फाजील, विकार जागृत होतात किंवा तरुणपणीं देखील विषयाभावीं विकारजागृति दुरावते. तथापि Psycho-Physical-paralism म्हणजे मन व शरीर यांच्या वाढींत साम्यान्तर असल्यामुळें सामान्यपणें विकारजागृतीचा शरीरवाढीशीं व पर्यायानें वयोवृद्धीशीं जोड घालतां येईल. या दृष्टीनें मूल चार महिन्यांचें झाल्यावर ऑडिपस कॉम्प्लेक्स बनूं लागतें, असें म्हणतां येईल. या कॉम्प्लेक्ससंबंधीं आणखी एक गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. ती म्हणजे, विकार हे क्षणिक असून निरनिराळ्या वेळीं ते बदलत असतात. वरील कॉम्प्लेक्समुळें बालकाच्या मनांत आईबद्दल




अनुक्रमणिका

अनुराग व बापाबद्दल द्वेष हे विकार उदित होऊं लागतात. परंतु याचा अर्थ आईबद्दल नित्य अनुराग व बापाबद्दल नित्य द्वेष असतो, असा मात्र नव्हे. तर केव्हां केव्हां आईबद्दल द्वेष व बापाबद्दल अनुराग उत्पन्न होऊं लागतो. याचें कारण असें कीं, मनाला, ज्याच्यामुळें आपली इच्छा तृप्त होते त्याबद्दल प्रेम व ज्याच्यामुळें ती अडली जाते त्याच्याबद्दल द्वेष वाटतो, ही गोष्ट फक्त स्पर्शसुखेच्छेच्या बाबतींतच नसून,सर्वच इच्छांच्या बाबतींत असल्यामुळें, जर बालकाच्या मनांतील एखादी इच्छा एखादे वेळीं बापाच्या आचरणानें पूर्ण होत असून, आईमुळें अडली असेल तर बापाबद्दल प्रेम व आईबद्दल क्रोध तेवढ्यापुरता उत्पन्न होतो.पुल्लिंगी मुलाच्या बाबतींत ज्या गोष्टी आहेत त्याच्या उलट स्त्रीलिंगी मुलाच्या बाबतींत दिसून येतात. पुल्लिंगी मुलाला आईबद्दल राग व बापाबद्दल द्वेष वाटतो, तर स्त्रीलिंगी मुलाला आईबद्दल द्वेष व बापाबद्दल राग वाटतो, असें आढळून येतें. तसेंच या ऑडिपस काम्प्लेक्सचें, जेव्हां बालक विवाहित बनतो तेव्हां, विषयतः रूपान्तर होतें. म्हणजे आईबद्दल वाटणारा राग-अनुराग-नष्ट होऊन द्वेष वाटूं लागतो, उलट बापाकडे आकर्षण वाटूं लागतें. असो; योग्य स्थळीं याचें विवरण करूं.

ऑडिपस काम्प्लेक्ससंबंधीं दुसरी लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे अशी कीं, मुलाच्या आईबापांपैकीं एकजण मरण पावलें तर ऑडिपस कॉम्प्लेसमध्यें फरक पडतो. आई व बाप यांपैकीं जें जिवंत असेल त्याबद्दल सर्वथा अनुराग, त्याच्याकडेसच सर्वस्वी आकर्षण वाटत असतें. आकर्षण-विकर्षणाचा नियम येथेंही लागू आहेच. याप्रमाणें या कॉम्प्लेक्स मध्यें दोन वेळेस फरक पडतो हें आपण पाहिलें; पहिली वेळ म्हणजे आईबापांपैकीं एखादा मृत्यु पावला असतां व दुसरी वेळ म्हणजे मूल विवाहित झालें असतां. आणखी एक वेळ सदर कॉम्प्लेक्समध्यें फरक पडतो. ती वेळा म्हणजे त्या मुलालाही जेव्हां मूल होतें तेव्हां. त्या वेळीं राग व द्वेष या दोनही भावना त्याच्या मुलाच्या ठिकाणींच खिळलेल्या असतात. बापाला मुलाबद्दल रागद्वेष एकसमयावच्छेदें वाटत असतो. हें कसें याचाही पुढें विचार होईलच. या ठिकाणीं आपल्याला इतकेंच पाहावयाचें आहे कीं, ऑडिपस् कॉम्प्लेक्समध्यें स्थित्यंन्तरें केव्हां केव्हां होत असतात. तीं स्थित्यंन्तरें बालकाच्या आयुष्यांत तीनदा होत असतातत हें आपण पाहिलें.

आतांपर्यंत मूल आणि आईबाप यांचा संबंध घेऊन त्यामुळें राग व द्वेष या भावना कशा उत्पन्न होतात आणि ऑडिपस काम्प्लेक्स कशी बनत जाते याचें विवरण केलें. यानंतर कुटुंबांतील इतर मंडळी, भाऊ-बहिणी वगैरे यांचा संबंध घेऊन त्यांपासून इतर विकार कसे उत्पन्न होतात हें पाहावयाचें आहे. मूल जसजसें वृद्ध होत जातें, तसतसें त्याला स्पर्शसुखाचा विषय लहान लहान असावा असें वाटतें. मूल हें प्रथम आईवर प्रेम करतें,पण जसजसें तें वाढतें तसतसें त्याचें प्रेम बहिणीवर जडत जातें. याचें कारण त्वरित वृत्तिच होय. मूल मोठें झालें म्हणजे विशेषतः स्तनपान तुटलें म्हणजे, मूल हें आईपेक्षां बहिणीच्या अंगावर विशेष राहतें,कारण आईपेक्षां बहिण ही लहान असते. वरील वृत्तीमुळेंच तरुणपणीं मूल हें आपल्यापेक्षां वयानें लहान अशा स्त्रीवर प्रेम करून तिच्याशीं विवाहबद्ध होऊं इच्छितें. आणि म्हातारपणीं स्वतःच्या मुलापेक्षांही नातवावर अधिक प्रेम जडतें. अंगावरचें दूध तुटल्यावर बालकांत मोठ्यापेक्षां लहानाकडे आकर्षिलें जाण्याची वृत्ति फोकावत जाते. बालकाच्या मनांत अशी वृत्ति उत्पन्न होण्याचीं कारणें दोन आहेत.

Psycho-physical-paralism चें तत्त्व मनुष्याच्या वागण्यांत नेहमीं असल्यामुळें बालक अगदीं लहानपणीं आईकडेच सर्वस्वी आकर्षिलेलें असतें. मुलाला आईच्या स्पर्शानें सुख मिळतें व आईच्या स्तनांतून दूध मिळतें. यामुळें मानसिक व शारीरिक आकर्षण आईकडे असतें. पण दुध तुटल्यावर शारीरिक आकर्षण म्हणजे शरीरसंवर्धनार्थ




अनुक्रमणिका

आकर्षण कमी होऊन स्पर्शसुखेच्छेनें होणारें आकर्षण तेवढें कायम राहातें. या वेळीं मुलाला आईची गरज येवढ्यासाठीं वाटते कीं, आईमुळें त्याची स्पर्शसुखेच्छा तृप्त होते. मूल मोठें झाल्यावर ही स्पर्शसुखेच्छा वहिणीच्या स्पर्शानें देखील तृप्त होऊं शकते, म्हणूनच तें मोठें झाल्यावर म्हणजे दुध तुटल्यावर वहिणीकडे बालक विशेष आकर्षिलें जातें. हें बहिणीकडील आकर्षणाचें एक कारण आहे. व दुसरें कारण असें कीं, बालक वाढूं लागलें म्हणजे त्याच्या अनुरागाच्या मार्गांत आड येणाऱ्या या गोष्टी काढून टाकण्याची प्रवृत्ति उत्पन्न होते. जेव्हां मूल रांगूं शकत नाहीं तेव्हां जर आईनें, त्याची इच्छा असतांना, त्याला घेतलें नाहीं तर तें बसल्या ठिकाणाकडूनच नुसतें रडून आईला स्वतःस घेण्यासाठीं भाग पाडतें, पण तेंच जर मूल रांगूं शकत असलें तर आईकडे रांगत जाऊन तिला घ्यावयास लावतें व याप्रमाणें आपली इच्छा आईला तृप्त करावयास लावतें आणि स्वतःच्या अनुरागानें मार्गांत तात्पुरती आलेली अडचण दूर करतें. याचप्रमाणें मूल आणखी मोठें झालें म्हणजे स्वतः इच्छा तृप्त करण्यासाठीं तें विविध मार्गांनीं इतरांस भाग पाडतें. पण आई ही फारच मोठी असल्यामुळें मूल हें आपल्या आईला स्वतःची इच्छा तृप्त करविण्यास भाग पाडूं शकत नाहीं. म्हणून तें आपला ओढा लहानांकडे लावूं लागतें. या तऱ्हेनें मूल वाढलें म्हणजे त्याचा ओढा आईवरून उठून वहिणीकडे झुकूं लागतो; हें दुसरें कारण. आणि या दोन कारणांमुळेंच, तें मूल तरुण झालें म्हणजे त्याचा ओढा पत्नीकडे लागतो. तारुण्यावस्थेंत बाल्यावस्थेंतील सुखेच्छांना विशिष्ट स्वरूप प्राप्त होतें. कारण, शरीराची वाढ झाल्यामुळें इन्द्रियें हीं विशिष्ट विशिष्ट विकार विशिष्ट विशिष्ट पद्धतीनें पूर्ण करण्यास समर्थ झालेलीं असतात. यामुळें भिन्न कुलांत जन्मलेल्या व वयानें लहान आणि बाकीचे आकर्षक गुण असलेल्या स्त्रीकडे त्याचा ओढा लागतो. भिन्न कुल व वयानें लहान या दोन गुणांकडे लक्ष देण्याचें कारण स्वेच्छातृप्तीच्या आड कोणतीही अप्रतिकार्य गोष्ट उभी राहूं नये हें होय. तसेंच तें मूल म्हातारें झालें असतां त्याचा ओढा नातवाकडे लागतो. याच्या मुळाशींही वरील दोन कारणेंच आहेत. असो. या वर सांगितलेल्या कारणांमुळें बालकाचें मन आईच्या अंगावरील दूध तुटल्यावर, आईपेक्षां बहिणीकडे विशेष लागतें.

वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें बालकाच्या मनाचा ओढा आईकडून बहिणीकडे झुकला म्हणजे आईकडे प्रथम जें आकर्षण असतें त्याचें रूपही बदलत जातें. पहिलें आकर्षण निरपेक्ष असतें, पण दुसरें आकर्षण सापेक्ष असतें. पहिल्या आकर्षणांत स्पर्शसुखेच्छेबरोबरच शरीरसंवर्धनार्थ दुध पिण्याची इच्छाही असते, पण दुसऱ्या म्हणजे बहिणींकडील आकर्षणांत स्पर्शसुखेच्छाच प्रधान असते. आईकडील आकर्षण हें आदरभावाचें बीज असतें, तर बहिणींकडील आकर्षण हें प्रेमाचें बीज असतें. आदर व प्रेम या दोन विकारांत फरक आहेत. आदर या विकारांत ज्याच्याबद्दल आदर असतो तो मोठा व आपण लहान अशी वृत्ति असते; पण प्रेम या विकारांत दोघेही समान अशी वृत्ति असते. ( वात्सल्यांत आपण मोठे व ज्याच्यावर प्रेम करतों तो लहान, अशी भावना असते. ) आकर्षणाच्या स्थित्यंतराबरोबरच बालकाच्या मनांत आदरभाव, प्रेमभाव व पुढें वृद्धिंगत झाल्यावर वात्सल्यभाव उत्पन्न होत असतात. असो.

बालक वाढल्यावर ज्याप्रमाणें आईकडील आकर्षण बहिणीकडे वळूं लागतें, त्याचप्रमाणें बापापासून विकर्षण हें भावां(बन्धु)पासून विकर्षणांत परिणत होत असतें. मूल जसजसें वाढत जातें, तसतसें बापाबद्दलची द्वेषाची भावना मावळत जाऊन, ती बांधवाबद्दल जागृत होते. या स्थित्यंतराचें कारण एक तर बापाचें महत्त्व, स्वतःच्या जीवनासाठीं किती आहे हें त्याला कळूं लागतें व दुसरें कारण असें कीं, भाऊ हा आईबापांच्या आपल्या स्वतःवर असलेल्या प्रेमांत वांटेकरी होतो. या दोन कारणांमुळें भावांबद्दल द्वेष उत्पन्न होतो; त्या द्वेषाच्या



भावनेमुळें ईर्षा व मत्सर हे विकार उत्पन्न होतात. एका आईबापाच्या पोटीं जन्मास आलेलीं मुलें पुढें हाडवैरी भाऊबंद कां निपजतात, यांचें कारण बाल्यावस्थेंत पाहावयास सांपडतें.

कुटुंबांत आई-बाप, भाऊ-बहिणी, आणि वृद्ध मनुष्यें यांचा समावेश होतो. मूल कुटुम्बांतील म्हाताऱ्या मनुष्याच्या अंगावरही फार राहातें. याचें कारण असें कीं, लहान मुलांवर इतरांपेक्षां वृद्धांचें प्रेम विशेष असतें. ( वर सांगण्यांत आलेंच आहे कीं, मूल हें वृद्ध झाल्यावर त्याच्या प्रेमाचा विषय मूल हें बनत असतें. ) आकर्षणाला प्रेमाचें स्वरूप प्राप्त झालें म्हणजे इतरांनींही आपल्यावर प्रेम करावें ही भावना वाढत जाते. ही भावना, मूल हें म्हाताऱ्या मनुष्यापाशीं असतांना तृप्त होऊं लागते. म्हाताऱ्याकडील आकर्षणांतून मोह व लोभ हे विकार उत्पन्न होऊं लागतात. मोह म्हणजे प्रेमाचा विषय जवळ असणें ही इच्छा, व लोभ म्हणजे तो विषय जास्त प्रमाणांत पाहिजे ही हांव. येणेंप्रमाणें मूल पांच वर्षांच्या आंत असेपर्यंतच मुलाचा व कुटुंबांतील इतर माणसांचा संबंध आल्यामुळें त्याच्या विषयसंयोगइच्छेंतूनच विकार हे उत्पन्न होतात. रागापासून आदर, प्रेम, काम, ( विशेष अर्थात् ) मोह व लोभ हे विकार उत्पन्न होतात. द्वेषामुळें क्रोध, ईर्षा, मत्सर हे विकार उत्पन्न होतात. हे द्विविध विकार म्हणजे राग आणि द्वेष यांचीं भिन्न रूपें आहेत; विषयानुरोधानें परिवर्तिक रूपें आहेत, हें मागें मनोविश्लेषणशास्त्रावरील ५ व्या लेखांत स्पष्ट दाखविलें आहेच. असो.

या लेखांत आपण कुटुंबांत वाढतांना मुलाचे विकार कसे बनतात हें पाहिलें. हे विकार बनण्याचें काम वयाच्या पांच वर्षांच्या आंतच बनतें. तसेंच कुटुम्बांतील ज्या मनुष्याचा योग विशेष घडतो व त्याच्याकडे आकर्षण जितक्या प्रमाणांत तृप्त किंवा अतृप्त होऊं लागतें त्या मानानें तो विकार विशेष तऱ्हेनें वाढतो किंवा कमी होतो. वाढलेला विकार हाच मुलाचा स्वभाव बनवितो. मूल हें आपल्या आयुष्यांत क्रोधी, मत्सरी किंवा लोभी बनेल हें बाल्यावस्थेवरच अवलंबून आहे. पांच वर्षांच्यानंतर या विकारांचा कुटुम्बाच्या बाहेरील लोकांशीं संबंध आला म्हणजे आणि तें वाढूं लागलें म्हणजे त्यांचें परिवर्तन विचार, वृत्ति, प्रवृत्ति, निर्णय, स्मृति, बुद्धि वगैरे मनाचीं विशेष अंगें वाढूं लागतात. अशीं परिवर्तनें कां व कशीं होऊं लागतात याचा विचार यापुढील लेखांतून होणार आहे. या मालेच्या चवथ्या लेखांकांत विकारांपासून विचार वगैरे उत्पन्न होण्यासाठीं बालकाच्या मनाची रचना कशी बनते याचें विवेचन करावयाचें आहे. पण त्यापूर्वी विकारांपासून विचार वगैरे कसे उत्पन्न होतात हें लक्षांत यावें म्हणून पुढील लेखांत त्यांचें स्पष्टीकरण करून, मग या मालेच्या चवथ्या लेखांकाकडे वळूं.






अनुक्रमणिका

## देवा, तुझें गान–

( अभंग )

देवा, तुझें गान जिवाला विसावा  
अंतरींचा लाव्हा शांत त्यानें  
देहलता माझी ओसाडशा कोनीं  
मांडव निर्मुनी राखलीस  
करुणेच्या सिंधो बिंदूचीच प्यास  
ती घालविलीस कृपानदें  
निर्जल प्रदेशीं पाडुनी पर्जन्य  
मरूचें नंदन बनविलें  
सावलींत तुझ्या पोळलेला जीव  
उन्हाळा अतीव बाधे ना त्या  
आणिक मायेची ऊब तुझी मला  
कुठला हिंवाळा राहील तो  
उपकाराचें ह्या लादलेंस ओझें  
माझें सारें तुझें– देऊं काय ?  
उतराई कैसा होऊं मी दयाळा  
हृदींचा उमाळा आवरेना  
गाऊं तुझें गान ?– पावा मी कृपाळा  
स्वरभाव मला तुझ्यामुळें  
साधनत्व माझें साध्य तूंच एक  
सद्भाव साधक सूत्रधारा !  
देवा तुझें गान अखंड संगत  
बेसूर संगीत कर गोड

अशोक, नाशिक

---






अनुक्रमणिका

# अस्सल मराठी छंदांचा ऐतिहासिक विचार

## दिण्डी ( कीं दण्डी ? )

### लेखांक २ रा

[ लेखकः—रा. रा. **अनंत का. प्रियोळकर**, बी. ए. ]

आज ज्या छंदाला आपण दिंडी म्हणतों त्या छंदाचें लक्षण वृत्तदर्पणामध्यें पुढीलप्रमाणें सांगितलें आहे:—

" दिंडीला चार चरण असतात, आणि चरणाच्या शेवटीं यमक असतें. त्यांत कोठें कोठें दोन चरणांसारखीं, कोठें चारी चरणांसारखीं यमकें असतात. या छंदास अक्षरांचा नियम नाहीं. पण मात्रांचा नियम आहे. प्रत्येक चरणास १९ मात्रा असतात. आणि नवव्या मात्रेवर अवसान येतें. म्हणून ९ मात्रांचा एक व १० मात्रांचा एक असे दोन भाग होतात. त्यांच्या मात्रांची रचना अशी असावी कीं, पहिल्या भागांत प्रथम तीन मात्रांचा एक गण, म्हणजे एक गुरु, एक लघु किंवा एक लघु, एक गुरु किंवा तीनही लघु असा असावा. त्यापुढें तीन गुरु किंवा सहा लघु किंवा लघु, गुरु मिळून सहा मात्रांचा गण असावा. दुसऱ्या भागांत पहिल्याप्रमाणें प्रथम तीन मात्रांचा गण, मग पुन: तसाच आणखी तीन मात्रांचा गण, त्याच्यापुढें म्हणजे शेवटीं दोन गुरु असावे."

स्वभावत: दिंडी हें जरी मात्रावृत्त असलें तरी पण ओवी किंवा अभंग याच्यासारखें तें अनिर्बंध वृत्त आहे, असें मानून जुने कवि त्याची रचना करीत आले आहेत. उदाहरणार्थ रघुनाथ पंडिताची कविता पाहा. संस्कृत वृत्तांमध्यें त्यानें जी कवितारचना केलेली आहे, तेथें वृत्तरचनेला नांव ठेवण्यास मुळींच कुठेंही जागा नाहीं, परंतु दिण्डीच्या बाबतींत तो आजच्या आमच्या दृष्टीनें अनेक ठिकाणीं घसरलेला आहे. अभंग वृत्ताला तुकारामामुळें ज्याप्रमाणें महत्त्व आलें, त्याप्रमाणें दिंडीच्या लोकप्रियतेचें पुष्कळसें श्रेय रघुनाथ पंडितालाच आहे. दिंडी छंदाचा त्यानें आपल्या काव्यांत भरपूर उपयोग करून घेतला आहे. मराठी छंद:शास्त्रकार दिंडीचीं उदाहरणें त्याच्याच काव्यांतून घेतात. परंतु वरील लक्षणाला जुळण्याकरितां त्याच्या काव्यांत कित्येक ठिकाणीं सुधारणा करावी लागली आहे. वृत्तदर्पणामध्यें व गणेशशास्त्री लेले यांच्या साहित्य-शास्त्र या पुस्तकांत दिलेलें दिंडीचें उदाहरण पहा:—

चौगुणीनें जरि पूर्ण शीतभानू ।
नळा ऐसा तरि कळानिधी मानूं ॥
प्रतापाचा जो न मावळे भानू ।
तयासारीखा कोण दुजा वानूं ॥ १ ॥

यांतील चौथा चरण नवनीताच्या पहिल्या आवृत्तीमध्यें,

तया समान कोण दुजा वानूं ।

असा आहे. नवनीताच्या पांचव्या ( इ. स. १८६४ ) आवृत्तीपासून या काव्याच्या दिंड्यांच्या कित्येक चरणांमध्यें सुधारणा ( ? ) करण्यांत आली आहे. आणि पार बदलल्याशिवाय ज्यांत सुधारणा होत नाहीं ते अद्याप अशुद्ध आहेत. उदाहरणार्थ आणखी कांहीं स्थळें पहा:-

जुनें नवनीत—आले जासूद वदति नैषधासी ।
नवें नवनीत—हेर, आला तो वदे नैषधासी ।

---

१. प्रो. पारसनीस यांनीं जें नलोपाख्यानांतील वृत्तांचें कोष्टक आपल्या प्रतीमध्यें दिलें आहे, त्यावरून रघुनाथ पंडितानें एकंदर १८ निरनिराळीं वृत्तें आपल्या या काव्यामध्यें (२५३) योजिलीं असून, त्यापैकीं सर्वांत जास्त वसंततिलका (७६) व त्याच्या खालोखाल दिंडी (७२) वृत्त योजिलें आहे, असें दिसून येतें. प्रो. पारसनीस यांची ही श्लोकसंख्या अगदीं बिनचूक नसली तरी अंदाजाला उपयोगी पडण्यासारखी आहे.




अनुक्रमणिका

जु. न. करूं लागला भूप या विचारा।
न. न. करूं लागे तैं भूप या विचारा।
जु. न. तया विदर्भदेशीं झेंपावे।
न. न. तया वैदर्भी देशिं झणी पावे।

"नमा मानूनी निकषपाषाणा।" या चरणाची सहज दुरुस्ती करतां न आल्यामुळें तो नव्या नवनीतांत अशुद्धच आहे.

**दिंडी वृत्त** किती मागें आढळतें याचा शोध करूं गेल्यास **शिवपूर्वकालीन** कोणत्याही कवीनें त्याचा उपयोग केलेला मला आढळला नाहीं. शिवकालीन कवींपैकीं देखील आनंदतनय, रघुनाथ पंडित व उद्धवचिद्घन यांनींच दिंडी **प्रथम** आपल्या काव्यांत योजिलेली दिसते. यापैकीं आनंदतनयानें आपल्या सुप्रसिद्ध सीतास्वयंवरामध्यें, तें आख्यान विविध वृत्तांत असूनही दिंडी वृत्त योजलेलें नाहीं. विश्वामित्रागमन, पूतनावध व शिबी आख्यान या तीनच कवितांमध्यें अगदीं थोडया दिंडया आहेत.[2] त्याच्या व रघुनाथ पंडिताच्या दिंडयांमध्यें पुष्कळ शब्दसाम्य व यमकादि रचनासाम्य आहे. पूतनावध काव्यामध्यें त्यानें दिंडी छंदाचा उल्लेखही केला आहे:–

वयें सोळा वर्षीचि उभी ठेली।
सुतारुप्यें तारुण्य गुणठेली॥
नंदपुत्राच्या दर्शना भुकेली।
दिंडी ऐशी आनंदसुतें केली॥

वामन पंडित किंवा विठ्ठल बिडकर हेही याच काळचे. परंतु, त्यांनीं दिंडी वृत्तांत रचना केलेली नाहीं. उद्धव-चिद्घनानें ध्रुवाख्यान, शुकरंभा-संवाद व त्रियाळ-चरित्र हीं तीन काव्यें दिंडी वृत्तामध्यें रचलेलीं आहेत. यांपैकीं ध्रुवाख्यान हें काव्य अत्यंत लोकप्रिय असून आबालवृद्धांच्या तोंडीं खेळत आहे. तें चिंतामणि नांवाच्या कवीचें आहे अशी कालपरवांपर्यंत समजूत होती, परंतु तें उद्धवचिद्घनाचेंच असल्याबद्दल मागें मीं साधार सिद्ध केलें आहे.[3]

यानंतर जी दिंडी वृत्तात्मक अशी काव्यरचना दृष्टीस पडते, तीवर उद्धवचिद्घनाची किंवा रघुनाथ पंडिताची स्पष्ट छाप पडलेली दिसते. उदाहरणार्थ नरहरिकृत[4] गंगारत्नामालेमध्यें आलेल्या दिंडया ध्रुवाख्यान पुढें ठेवून लिहिलेल्या दिसतात. देवनाथाच्या (श. १६७६–१७४३) काव्यावर उद्धवचिद्घन व रघुनाथ पंडित या दोघांचीही स्पष्ट छाया आहे. त्यांच्या 'श्रावणाख्यानांत' आपणांस ध्रुवाख्यान प्रतिबिंबीत दिसतें, तर कृष्णजन्मांत रघुनाथ पंडिताच्या नलदमयंती-स्वयंवराख्यानाचें रूप न्याहाळतां येतें.[5]

अनंत कवीनेंही (श. १६४३) आपल्या सीतास्वयंवरांत दिंडीबद्ध रचना केली आहे. त्यानें उद्धवचिद्घन किंवा रघुनाथ पंडित यांचें अनुकरण केलेलें नाहीं. परंतु त्याची दिंडी अत्यंत ओबडधोबड आहे.[6]

राघवानें (हा कवि पेशवाईनंतरचा म्हणतात.) आपल्या वीरमणि या काव्यांत दिंडी योजिली आहे. परंतु, विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, त्यानें संस्कृत भाषेमध्येंही दिंडीबद्ध रचना केली आहे.[7]

जगव्यापिश्री रामदर्शनेन।
जन्मते वै सर्वतः प्रमोदेन।
मिथः सैन्यं मीलितं महाप्रीत्या।
अवादन्त वाद्यानि एकमत्या॥
शिवोऽप्यापृच्छक्ष्माभृतं जगाम।
तिरोभूत्वा प्रमथादिभिः स्वधाम॥
वीरमणिना शत्रुघ्नसमेतेन।
कृतं गमनमश्वानुसारकेन॥

याखेरीज दिंडीबद्ध रचना करणारे आणखी कांहीं कवि म्हणजे–कृष्णदास (शिवरात्रिचरित्र)[8], सरबो नाईक (गोपीचंदाख्यान),[9] रविदास (कुबेरलक्ष्मी गर्वहरण).[10] ज्यांचा कर्ता कळत नाहीं अशा मयशक्तिचरित्र,[11]

२. आनंदतनयकृत कवितासंग्रह (काव्यसंग्रह) पाहा.
३. लोकशिक्षण, पुणे. जानेवारी १९३२ पाहा.
४. अनेक कविकृत कविता भा. ४ था (काव्येतिहाससंग्रह) इ. स. १८८९ पृ. ७, ९, १२. पाहा.
५. श्रीदेवनाथ महाराजांची कविता (वैदर्भकाव्यसंग्रह २) पृ. १३९ व १४५
६. अनंत कविकृत कवितासंग्रह (काव्यसंग्रह १७ पृ. १)
७. लघुकाव्यमाला (काव्यसंग्रह १४) पृ. २०९
८. लघुकाव्यमाला (काव्यसंग्रह ३८) पृ. १
९. लघुकाव्यमाला (काव्यसंग्रह ४७) पृ. ५४
१०. पृ. १८१
११. पृ. ७३






अनुक्रमणिका

गयगंधर्वाख्यान[१२], उषास्वयंवर[१३] वगैरे काव्यांतही दिंड्या आढळतात.

दिंडी या शब्दाच्या उगमासंबंधीं राजवाडे लिहितात:—[१४]

" दिंडी हा शब्द दिंडिम या संस्कृत शब्दाचा अपभ्रंश आहे. दिंडिम=डिंडिम=दिंडिअ=दिंडी. दिंडिम हें वाद्यविशेष आहे. त्याप्रमाणें ज्याचा नाद कल्पनेनें भासतो तो छंद दिंडी होय. नांवावरून दिसतें कीं हा छंद महाराष्ट्री भाषेंतून मराठींत घेतला असावा..." " दिंडी संस्कृत पिंगलांत, प्राकृत पिंगलांत, किंवा छंदशास्त्रावरील कोणत्याही संस्कृत ग्रंथांत सांगितलेली नाहीं. परंतु व्युत्पत्तीवरून हें वृत्त महाराष्ट्री भाषेंत असावें असा तर्क होतो....प्राकृत पिंगल इ. स. चौदाव्या शतकाच्या सुमारास लिहिलेलें असून, त्यांतील छंद दहाव्या शतकापासून चौदाव्या शतकापर्यंतच्या हिंदुस्थानांतील जुन्या हिंदु ऊर्फ प्राकृत भाषेला अनुलक्षून लिहिलेले आहेत. तेव्हां पांचव्या शतकांतल्या महाराष्ट्री भाषेंतील छंदाचें स्वरूप प्राकृत पिंगलावरून अनुमानणें किंवा निश्चयानें ताडणें धोक्याचें आहे. तथापि **दिंडी पांचव्या शतकाइतकी जुनी आहे** यांत शंका नाहीं. महाराष्ट्री छंदांचा ग्रंथ सांपडेपर्यंत दिंडी हें मात्रावृत्त मराठींत नवीन आहे, असें मानणें जरूर आहे. " राजवाडे यांच्या मताप्रमाणें डिंडिम या चर्मवाद्यावरून दिंडी शब्द अस्तित्वांत आला. वास्तविक ' दिंडी ' किंवा ' दिंडिर ' याही नांवाचें संस्कृतमध्यें वाद्यविशेष आहे. तें तंतुवाद्य कीं चर्मवाद्य, हें ठाऊक नाहीं. डिंडिमपासून दिंडी शब्द आला म्हणण्यापेक्षां त्याचा उगम सरळ ' दिंडि 'कडे आहे, असें म्हणणें बरें. दिंडी या शब्दावरून आंखुड दरवाजा किंवा खिडकी, भजनी मेळा, छंदविशेष व वाद्यविशेष असा चार गोष्टींचा सध्या बोध होतो. दिंडी या वाद्यविशेषाचा उल्लेख ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ वगैरे संतकवींच्या अभंगांमध्यें आहे. परंतु यांपैकीं कोणींही दिंडी वृत्तांत रचना केलेली दिसत नाहीं.

मी सध्यां तयार करीत असलेल्या रघुनाथ पंडितकृत नलदमयंती-स्वयंवराख्यानाच्या नव्या आवृत्तीकरितां त्या काव्याच्या हस्तलिखित प्रती मिळवीत आहें. त्यापैकीं तंजावरच्या सरस्वतीमहाल लायब्ररींत असलेल्या हस्तलिखितांच्या एका प्रतीमध्यें दिंडी ऐवजीं " दंडी चाली" असें लिहिलें आहे, असें दृष्टोत्पत्तीस आलें. जुन्या काळचीं हस्तलिखितें फार अशुद्ध लिहिलेलीं असतात. त्यापैकींच हा नक्कलकाराचा लेखनप्रमाद असावा, असें मला प्रथम वाटलें. परंतु या गोष्टीचा जास्त विचार करितां दंडी, हाच खरा शब्द असून ' दिंडी ' ही पुढील लेखकांनीं पुढें केलेली दुरुस्ती होय असें मला वाटूं लागलें आहे. दासबोधामध्यें या छंदाचा उल्लेख आहे. सत्कार्योत्तेजक मंडळी, धुळें, या संस्थेनें डोमगांव येथील मठांत असलेल्या श्रीकल्याणस्वामींच्या हातच्या मूळ हस्तलिखितावरून छापलेल्या दासबोधाच्या प्रतींत पुढील मजकूर आहे:— ' रेखेचें गुंडाळें केलें। मात्रुकाक्षरीं शब्द जाले। शब्द मेळऊन चाले। श्लोक गद्य प्रबंद ॥१॥ वेदशास्त्रें पुराणें। नाना काव्यें निरूपणें। ग्रंथभेद अनुवादणें। किती म्हणोनी ॥ २ ॥ नाना ऋषि नाना मतें। पाहों जातां असंख्यातें। भाषा लिपी जेथें तेथें। काये उणे ॥ ३ ॥ वर्ग ऋचा श्रुति स्मृति। अधे स्वर्ग स्तबक जाती। प्रसंग मानें समास पोथी। बहुधा नामे ॥ ४ ॥ नाना पदें नाना श्लोक। नाना बीर नाना कडक। नाना साख्या दोहडे अनेक। नामाभिधानें ॥५॥ डफगाणें माचिगाणें। **दंडिगाणें** कथागाणें। नाना माने नाना जसनें। नाना खेळ" ॥६॥[१५]...(दशक १२ समास ५)

इतर दासबोधाच्या प्रतीमध्यें दंडीगाणें याची('दिंडीगाणें) अशी दुरुस्ती (?!) करून शब्द घातला आहे, परंतु या सर्वांत श्रीसत्कार्योत्तेजक मंडळींचाच दासबोध प्रमाण मानला पाहिजे.

---

१२. लघुकाव्यमाला ( काव्यसंग्रह १४ )पृ. ५३

१३. ( काव्यसंग्रह ४७ )पृ. ७९

१४. श्री सरस्वतीमंदिर, वर्ष ६, अ. ५–मराठी छंद पृ. ४ व २८.

१५. श्रीमत्दासबोध ( सत्कार्योत्तेजक सभा, धुळें ) श. १८४२ आवृत्ति ४ थी पाहा.



दिंडी ऐवजीं दंडी हेंच नांव खरें असावें, याला आणखी एक जबरदस्त आधार आहे. तो म्हणजे महाराष्ट्रभाषेच्या कोशाचा. अत्यंत जुन्यांत जुना मराठी (-इंग्रजी ) कोश म्हणजे डॉ. केरेचा होय. इ. स. १८१० मध्यें तो छापला. हा मराठी-इंग्रजी असून, त्यामध्यें दंडी किंवा दिंडी शब्द नाहीं. त्याच्यानंतर पंडित-मंडळानें इ. स. १८३१ मध्यें प्रसिद्ध केलेला जो उपरिनिर्दिष्ट महाराष्ट्रभाषेचा कोश त्याच्यामध्यें दिंडी शब्द नसून दंडीच शब्द आहे आणि त्याचा अर्थ—" छंदोविशेषानें बांधलेली एक कविता आहे," असा दिलेला आहे. इ.स. १८५७ सालीं प्रसिद्ध झालेल्या मोल्स्वर्थच्या कोशामध्यें दंडी व दिंडी हे दोनही शब्द एकाच अर्थी दिलेले आहेत. इ. स. १८७० सालच्या माधव चंद्रोबाच्या शब्द-रत्नाकर या कोशामध्यें हे दोनही शब्द दिलेले नाहींत. गुजराथी भाषेमध्यें देखील दिंडीबद्ध कविता आहे. परंतु ती अगदीं अलिकडची. मराठींतून हा छंद त्यांनीं उचलला असें चौकशी केली असतां कळलें. 'दंडी' हा शब्द नलदमयंती स्वयंवराख्यानाच्या अत्यंत जुन्या हस्तलिखितामध्यें, अत्यंत विश्वसनीय अशा दासबोधाच्या प्रतींमध्यें. व एतद्देशियांनीं तयार केलेल्या पहिल्या महाराष्ट्रभाषेच्या शब्दकोशामध्यें सांपडतो, यावरून तोच खरा असून ' दिंडी ' हें पुढें चुकीनें केलेलें संस्करण असावें, असें वाटतें. दिंडी हा शब्द कसा अस्तित्वांत आला याचाही विचार केला पाहिजे. दंडी असलेलें असें पहिलें छापील काव्य म्हणजे नवनीतांतील ( इ. स. १८५४) नलदमयंती स्वयंवराख्यान होय. त्याच्यानंतर इ. स. १८६३ सालीं कविता-सारसंग्रह ( नवनीत भाग २ ) प्रसिद्ध झाला. त्यांत उद्धवचिद्‌घनाचें सुप्रसिद्ध दंडीबद्ध ध्रुवाख्यान चिंतामणीच्या नांवावर प्रसिद्ध झालें. एकदा नवनीतामध्यें 'दंडी'बद्दल 'दिंडी' असें छापलें गेल्यावर दिंडी हेंच नांव प्रमाण ठरून, पुढें इतर लोकही तसेंच लिहूं लागले असावे अशी एक शंका नवनीताची व त्याच्या संपादकांची तत्कालीन लोकांवरची छाप पाहिली, म्हणजे मनांत येतें. परंतु तंजावरच्या दुसऱ्या एका हस्तलिखितांत दिंडी असें लिहिलें आहे त्यावरून विकल्पानें दिंडी असाही शब्द जुन्या काळीं रूढ होता असें दिसतें.

दिंडीबद्दल दंडी हेंच नांव खरें, इतकें ठरलें तर, त्याची व्युत्पत्तिही शोधून काढणें जरूर आहे. दण्डक असें एका छंदोवर्गाचें नांव आहे. हेमचंद्रानें त्याची व्याख्या—

यत्किंचित् दृश्यते छंदः षड्विंशत्यक्षराधिकम् !
शेष जात्यादिकं मुक्त्वा तत्सर्वं दण्डकं विदुः ॥

अशी दिली आहे.[१६] परंतु दण्डकाचे जे निरनिराळे प्रकार आहेत, त्यांत आपली प्रस्तुत दंडी येत नाहीं. राजवाडे यांच्या मताप्रमाणें डिंडिमपासून जरी ह्या छंदाचें नांव उत्पन्न झालें नसलें, तरी पण त्याचा उगम एका वाद्यविशेषाकडे आहे ही गोष्ट खरी, हें डफगाणें, माचिगाणें किंवा दंडीगाणें असें जे शब्द दासबोधांत सांपडतात, त्यावरून दिसून येतें. दंडि या नांवाचें एक वाद्यविशेष होतें. इतकेंच नव्हे तर हें वाद्य घेऊन गात फिरणारी एक गोसाव्यांची जातही होती. तिला दंडिगाण म्हणत. महाराष्ट्र भाषेच्या कोशामध्यें **दंडी-गाण** याचा अर्थ " वर भोपळा आणि खालीं **दांडी** अशा रीतीचा वीणा बाळगून भीक मागणारी गोसाव्यासारखी एक जाति आहे. " असा दिला आहे. यावरून दंडी हें वाद्य कशा प्रकारचें असे हें आपणास कळून येतें. गाण म्हणजे गाणारा. 'लटिका मी गाणु लटिका मी नाचणु ' असा नामदेवाचा अभंग आहे. गोमांतकामध्यें कलावंत वर्ग गाण असें पूर्वी उपनांव धारण करीत. हल्लींच ते लोक मंगेशकर, कवळेकर, रामनाथकर किंवा नागेशकर अशीं गांवांवरून आडनांवें लावतात. असो. दंडी हें वाद्यविशेषाचें नांव वर वर्णन केल्याप्रमाणें त्याच्या दांडीवरून आलेलें दिसतें. आणि या वाद्यावरून दंडी छंदाला नांव मिळालें असावें. अर्थात् हा छंद राजवाडे तर्क करतात त्याप्रमाणें महाराष्ट्री भाषेमधून मराठींत घेतला नसून, तो ओवी किंवा अभंग या छंदाप्रमाणें अस्सल नागर मराठी छंद आहे, असें म्हणावयास सध्या तरी विशेष हरकत दिसत नाहीं. स्वभावतः हा मात्राछंद म्हणजे जाति आहे. परंतु एकंदर जुने कवि तें ओवी किंवा अभंग याच्यासारखें अनिर्बंध वृत्त मानून त्याची रचना करीत आले आहेत, हें वर सांगितलेंच.

१६. श्रीछंदोऽनुशासनम् (निर्णयसागर) इ.स. १९१२






अनुक्रमणिका

ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ वगैरे संतकवींच्या अभंगांमध्यें दिंडी नामक ज्या वाद्यविशेषाचा उल्लेख आहे तें या दंडीचें संस्करण असेल कीं काय, तें नक्की सांगण्यास जुनीं पुष्कळशीं हस्तलिखितेंच आपल्यापुढें असलीं पाहिजेत. परंतु जुनें दिंडी हें वाद्यविशेष प्रस्तुत दंडीपेक्षां निराळेंही असेल. संस्कृत भाषेंत दिंडि किंवा दिंडिर असल्याचा वर उल्लेख केला तें व दिंडी वाद्यविशेष एकच असेल काय?

प्रस्तुत प्रश्नासंबंधीं जास्त शोध करण्यास अवश्य असलेलीं साधनें व सवड मला नाहीं. अशा स्थितींत माझ्या नजरेपुढें आलेल्या गोष्टी केवळ उपन्यास म्हणून वाचकांपुढें ठेवीत आहें. पूर्वग्रहरहित व केवळ सत्यान्वेषण बुद्धीनें या प्रश्नाचा जास्त विचार होईल, अशी मी अपेक्षा करतों.

---

## लायकी

तव प्राणविसावा व्हांवा
मज कुठली लायकी ? ॥ धृ० ॥

लक्तरें न पुरती अंगीं
रूपहीन मी हतभागी
कमलजा दटावुन सांगे—
तुजवरती मालकी ॥ १ ॥

वीणेविण घे मी तान
हांसतो काक ऐकून
गातसे शारदा गोड—
ती तुमची लाडकी ॥ २ ॥

वासहीन माझें फूल
कृमिही न घेत चाहूल
करि उषा फुलांची झूल—
तुजसाठीं मंचकीं ॥ ३ ॥

दारीं न येउं दे कोणी
होईन कशी मग राणी ?
जी योग्य न पादत्राणीं—
पदवांछी मस्तकीं ॥ ४ ॥

तूं थोर, हीन मी बाला,
परि वरिलें अंतरिं तुजला
घे दैन्य, सोड मानाला—
मज आणण्या लायकी ॥ ५ ॥

तूं भिल्ल भिल्लिणीसाठीं
गवळीहि गोपिका चित्तीं
घे धांव जाणुनी प्रीती—
ठरवाया लायकी ॥ ६ ॥

मनिं ध्यास तुझा घेईन
तोंवरि तव चिंतिन दैन्य
ज्या दिनीं वदसि बिलगून—
"तूं माझी लाडकी" ॥ ७ ॥

वसंत रामकृष्ण वैद्य



# “ आर्य संगीतावरील संस्कृत ग्रंथ ”
## या पंडित दत्तात्रय केशव जोशी यांच्या निबंधांतील कांहीं विधानांचें परीक्षण *

[ लेखकः—रा. रा. **मंगेश रामकृष्ण तेलंग** ]

पंडित द. के. जोशी यांचा वर नमूद केलेला निबंध “भारतीय संगीत” या द्वैमासिकाच्या पहिल्या अंकांत ( आक्टोबर १९३२ ) प्रसिद्ध झाला आहे. त्या लेखांत त्यांनीं रामामात्य पंडितांच्या “ स्वरमेलकलानिधि ” नांवाच्या संगीतशास्त्रविषयक ग्रंथावर विवेचनात्मक टीका केली आहे. तो ग्रंथ कर्नाटकी ऊर्फ दक्षिणादी संगीतपद्धतीचा असल्यामुळें हिंदुस्थानी संगीतपद्धतीच्या विद्यार्थ्यांना उपयोगी नाहीं. तथापि,कर्नाटकी संगीताच्या जिज्ञासूंना कदाचित् त्याचा उपयोग होईल.

सदर लेखांत पंडित जोशी यांनीं श्रुति वगैरेविषयीं कांहीं विधानें केलीं आहेत. परंतु त्यांच्या समर्थनार्थ त्यांनीं प्राचीन ग्रंथांतील आधार किंवा उतारे दिले नाहींत. प्राचीन संगीतशास्त्रदृष्टीनें तीं विसंगत असल्यामुळें त्यांच्या खरेपणाविषयीं संशय येतो. अशीं संशयास्पद विधानें प्रसिद्ध झालीं असतां त्यांचा फोलपणा उघड न केल्यास सामान्य वाचकांस तीं विश्वसनीय वाटून त्यांची भलतीच समजूत होण्याचा संभव आहे. याकरितां पं. जोशांच्या लेखांतील तशा प्रकारच्या कांहीं विधानांचा विचार येथें करितों.

पंडित जोशी यांनीं आपल्या “विवेचनात्मक टीकेंत” पुढील विधान केलें आहे:-“ रत्नाकर ग्रंथ तेराव्या शतकांत झाला. त्याच्या श्रुति सप्रमाण होत्या असें विद्वानांचें व त्या ग्रंथावरील टीकाकार कल्लिनाथ व सिंहभूपाल यांचें मत आहे. तेव्हां त्यानें केलेली श्रुतींची वांटणी गणितशास्त्रास विरोधि नाहीं, इकडे या ग्रंथकाराचें लक्ष गेलें नसावें. आपल्या श्रुति सम किंवा विषम आहेत याचा त्यानें विचारच केलेला दिसत नाहीं. म्हणून ही त्याची चूक झाली असावी. ” —भा. सं. द्वै. ( पृ. ३२ पं ११ )

येथें रत्नाकराच्या श्रुति समप्रमाण होत्या असें विद्वानांचें व ग्रंथांवरील टीकाकार कल्लिनाथ व सिंहभूपाल यांचें मत आहे असें म्हटलें आहे. परंतु त्या विद्वानांच्या ग्रंथांतील किंवा सदर टीकाकारांच्या टीकेंतील उतारे, अथवा पृष्ठ, श्लोक, संख्या वगैरे मुळींच दिलीं नाहींत. संगीत–रत्नाकराच्या वर नमूद केलेल्या दोन्ही टीकांत रत्नाकराच्या श्रुति समप्रमाण आहेत असें कोठेंही म्हटल्याचें माझ्या नजरेस आलें नाहीं. याकरितां पंडित जोशी यांस सदर टीकांतील श्लोक, पृष्ठ वगैरेंचीं संख्या कळविण्याकरितां पत्र लिहिलें, परंतु त्यांनीं ती माहिती न देतां उलट मलाच कांहीं असंबद्ध प्रश्न करून टाळाटाळी केली.

माझ्या समजुतीप्रमाणें प्राचीन ग्रंथकारांनीं श्रुति समप्रमाण आहेत असें म्हटलें नाहीं. याचें कारण उघड

* “ भारतीय संगीत ” या नूतन द्वैमासिकाच्या पहिल्या अंकांत “ आर्यसंगीतावरील संस्कृत ग्रंथ ” या सदराखालीं दक्षिणेकडील रामामात्य पंडिताच्या स्वरमेलकलानिधि या ग्रंथावर पुण्याचे श्री. दत्तात्रय केशव जोशी यांचा एक टीकात्मक लेख प्रसिद्ध झाला होता. त्यांत श्री. जोशी यांनीं संगीतशास्त्रांतील कांहीं प्रमेयांविषयीं भ्रामक विधानें केलीं होतीं. त्या अशास्त्रीय विधानांनीं सामान्य वाचकांची दिशाभूल होऊं नये म्हणून तीं विधानें कशीं चुकीचीं आहेत हें आधारपूर्वक दाखविण्याकरितां प्रस्तुत लेख लिहून भारतीय संगीताच्या सपादकांकडे जानेवारी १९३३ मध्यें प्रसिद्ध करण्याकरितां पाठविला होता. परंतु संपादकमहाशयांनीं [redacted]१ महिने होऊन गेले तरी तो प्रसिद्ध केला नाहीं. याचें कारण त्यांनाच ठाऊक. श्री. जोशांचे लेखांतील भ्रामक विधानें वाचकांच्या नजरेस आणण्यास हा लेख महत्वाचा आहे म्हणून तो **विविधज्ञानविस्तार** मासिकाच्या सपादकांकडे प्रसिद्ध करण्याकरितां पाठविला आहे.

कारवार, २८।११।३३ **मंगेश रामकृष्ण तेलंग**





अनुक्रमणिका

आहे. गळ्यानें स्वर गायिले असतां त्यांचीं मूळ श्रुतिस्थानें मुळींच समजत नाहींत, हें अनुभवसिद्ध आहे. फक्त बीन, सतार, इत्यादि तंतुवाद्यांत स्वरांचीं मूलस्थानें म्हणजे श्रुति व्यक्त होतात. त्या श्रुतींमधलीं अंतरें स्वरांच्या उच्चतेच्या मानानें लहान होत जातात, ही गोष्ट प्रत्येक तंतकाराला अनुभवानें माहीत आहे. यावरून श्रुति समप्रमाण म्हणजे समान अंतरावर नाहींत हें प्रत्यक्षानें सिद्ध होतें. हाच अनुभव पूर्वींच्या संगीतज्ञ ग्रंथकारांना आला असावा. यामुळेंच त्यांनीं श्रुति समप्रमाण आहेत असें कोठेंही सांगितलें नाहीं. पंडित रामामात्याला तोच अनुभव आल्यामुळें त्यानें श्रुति समप्रमाण आहेत असें म्हटलें नसावें. यांत त्याचा कांहीं अपराध नाहीं. पंडित जोशी यांनीं श्रुति समप्रमाण आहेत अशी आपली गैरसमजूत करून घेऊन रामामात्याला दोष लाविला तो उचित नाहीं असें दिसतें. तरी त्यांनीं श्रुति समप्रमाण आहेत ह्याबद्दल ग्रंथांतील किंवा चालू संगीतशास्त्रांतील समर्पक प्रमाणें प्रसिद्ध करावीं अशी मी त्यांना विनंति करितों. तसें न केल्यास श्रुति समप्रमाण आहेत हें विधानच निराधार ठरेल हें उघड आहे.

वर उल्लेख केलेला पत्रव्यवहार झाल्यानंतर आतां असा एक चमत्कारिक अपूर्व योग घडून आला आहे कीं, या मासिकाच्या जानेवारी १९३३ च्या अंकांत पृ. ४२ वर एका " जिज्ञासू "नें आपलें नांव गुप्त ठेवून विद्वानांपुढें एक लांबलकच प्रश्नावलि मांडिली आहे. तींत नंबर २ चा प्रश्न असा आहे, " शार्ङ्गदेवाच्या बावीस श्रुति समान होत्या हें खरें काय ? नसल्यास उलट पुरावा त्या ग्रंथांत कोठें आहे ? " आश्चर्य हें कीं, पंडित जोशी यांनीं याच संबंधाचा प्रश्न मला विचारिला आहे. या जिज्ञासूनें आपलें नांव लपवून कां ठेवलें आहे ? सरस्वतिदेवीच्या जाहीर कारभारांत अशी छपवाछपव कां ?

आतां पंडित जोशी यांनीं दुसरें एक चमत्कारिक विधान केलें आहे तें असें: " श्रुति क्रमानें एकीपेक्षां दुसरी ध्वनीनें उंच, असें तो सांगतो. परंतु पहिल्या श्रुतीवर कैशिक निषाद, दुसरीवर काकली निषाद व तिसरीवर च्युत षडज् निषाद हे स्वर निघतात असें तो म्हणतो. तेव्हां चौथ्या श्रुतीपेक्षां या तीन श्रुतिध्वनीनें कमी असल्या पाहिजेत. निषाद स्वर ध्वनीनें उंच आहे हें सर्वांस मान्य होण्याजोगें आहे. असें असतां षड्जाच्या मागल्या श्रुतीचा ध्वनि षड्जापेक्षां उंच कसा हा प्रश्न साहजिक मनांत येतो. ही अनवस्था स्वर आपल्या शेवटच्या श्रुतीवर अभिव्यक्त होतो असें मानण्यानें होत आहे. तसें न मानितां स्वर आपल्या प्रथम श्रुतीवर अभिव्यक्त होतो असें म्हणण्यानें हा अवनस्था प्रसंग टळला असता. " भा. सं. द्वै. पृ. ३२ पं. १६

पंडित जोशी यांनीं कांहीं हेतु मनांत आणून प्राचीन शास्त्रकारांच्या मताच्या विरुद्ध स्वर आपल्या आद्य श्रुतिवर व्यक्त होणें इष्ट आहे असें गृहीत धरून, रामामात्यावर अनवस्था प्रसंग लादला आहे. रामामात्यानें भरतादिकांच्या शास्त्रनियमाप्रमाणें स्वर आपल्या शेवटच्या श्रुतीवर व्यक्त होतो हा सिद्धांत लक्षांत ठेवून षड्जाच्या मागचा शुद्ध निषाद षड्जाच्या श्रुति एक, दोन, तीन या क्रमानें घेऊन अनुक्रमें कैशिक, काकली व च्युत षड्जनिषाद होतात असें म्हटलें आहे तें यथार्थ आहे परंतु पंडित जोशांनीं स्वर आपल्या आद्य श्रुतीवर असतो अशा आपण कल्पिलेल्या खोट्या सिद्धांताचें अवलंबन करून " निषाद स्वर षड्जापेक्षां ध्वनीनें उंच आहे हें सर्वांस मान्य होण्याजोगें आहे. असें असतां मागल्या श्रुतीचा ध्वनि षड्जापेक्षां उंच कसा ? " असा असंबद्ध प्रश्न उपस्थित करून रामामात्याची थट्टा केली आहे. जर पंडित जोशांनीं आपला पूर्वग्रह सोडून थोडा विचार केला असता तर त्यांच्या लक्षांत आलं असतें कीं, रामामात्यानें म्हटल्याप्रमाणें षड्जाचा मागचा शुद्ध निषाद आपल्या पुढील षड्जाच्या श्रुति घेऊन विकृत झाला तरी षड्जापेक्षां नीच असूं शकतो. पंडित म्हणतात त्याप्रमाणें स्वराच्या श्रुति पुढें मानल्यास मागच्या निषादाला आपल्या पुढील षड्जाच्या श्रुति घेण्याला षड्जाला ओलांडून पुढें यावें लागेल ही आपत्ति रामामात्याचा दोष दाखविण्याच्या भरांत त्यांच्या लक्षांत आली नसावी. पंडित जोशी यांनीं अशी टीका करितांना रामामात्याच्या मूळ श्लोकांचा उतारा वाचकांपुढें ठेविला पाहिजे होता. ते श्लोक मी वाचकांकरितां पुढें देतों.








अनुक्रमणिका

" तस्य द्वाविंशतिर्भेदाः श्रवणात् श्रुतयो मताः ।
उच्चोच्चतरता युक्ताः प्रभवन्त्युत्तरोत्तरम् ॥ "

स्वरमेलक. पृ. ७.

" सुव्यक्तमेव वीणायामस्यार्थस्य निदर्शनम् ।
तत्र तुर्यश्रुतौ षड्जः सप्तम्यामृषभो मतः ॥ इत्यादि"

स्व. क. पृ. ९.

"हित्वा चतुर्थी स्वाधारश्रुतिं षड्जो यदाश्रुतिम् ।
तृतीयामाश्रयेदेष च्युतषड्जोऽभिधीयते "

स्व. क. पृ. १४.

" च्युतषड्जस्वरो लक्ष्ये निशादत्वेन कीर्तितः ।
च्युतषड्जनिशादाभिधानं तस्य विधीयते ॥"

स्व. क. पृ १६.

प्रथमां शुद्धषड्जस्य निषादश्चेत् श्रुतिं श्रितः ।
सकैशिकनिषादाख्यः कथितो गीतवेदिभिः ॥
निषादः शुद्धषड्जस्याश्रयते चेत् श्रुतिद्वयम् ।
स काकली निषादः स्यादेवं सप्तापि लक्षिताः ॥"

स्व. क. पृ. १५

या श्लोकांत रामामात्यानें प्राचीन शास्त्राप्रमाणें प्रत्येक श्रुति एकापेक्षां एक उंच ध्वनीची आहे, षड्जादिस्वर आपापल्या अंत्यश्रुतीवर व्यक्त होतात व निषाद वर लिहिल्याप्रमाणें षड्जाच्या श्रुति घेऊन तीन प्रकारानें विकृत होतो असें स्पष्ट सांगितलें आहे, तें सर्व प्राचीन शास्त्राला अनुसरूनच आहे. श्रुति समप्रमाण असत्या, तर त्यानें तसें सांगितलें असतें.

पंडित जोशी पृष्ठ ३२ वर शेवटच्या भागांत पुढील विधान करितात—

" श्रुतींतून स्वर उत्पन्न होतो हें म्हणणें समंजस दिसत नाहीं. ऐकिला जाणारा ध्वनि म्हणून शास्त्रकारांनीं त्यास श्रुति संज्ञा दिली.एखाद्या ध्वनीच्या लहरी ऐकणाऱ्याच्या कानांवर आपटल्या नाहींत तर त्यास तो ध्वनि श्रवणगम्य होणार नाहीं. तेव्हां श्रुति म्हणजे गीतोपयोगी नाद. सतराव्या शतकापर्यंत श्रुति व स्वर यांबद्दलच्या कल्पना बऱ्याचशा चुकीच्या होत्या असें कष्टानें म्हणावें लागतें. तसें नसतें तर—

" यथाप्सु चरतां मार्गो मीनानां नोपलभ्यते ।
आकाशे वा विहंगानां तद्वत्स्वरगता श्रुतिः ॥ "

अशा प्रकारचें पद्य आपणांस वाचण्याची पाळी आली नसती."

श्रुतींतून स्वर उत्पन्न होतो हें म्हणणें पं. जोशी यांना समंजस दिसत नाहीं. त्याचें कारण प्राचीन शास्त्रकारांनीं श्रुति व स्वर यांमध्यें जो भेद मानिला आहे त्याचीं कारणें यांना समजलीं नाहींत " असें कष्टानें म्हणावें लागतें. " प्राचीन ग्रन्थकारांनीं श्रुति आणि स्वर यांमध्यें भेद मानण्याचीं कारणें दिलीं आहेत तीं अशीं

" स्वरूपमात्रश्रवणान्नादोऽनुरणनं विना ।
श्रुतिरित्युच्यते भेदास्तस्या द्वाविंशतिर्मताः ॥ "

सं. दर्पण पृ. २१

टीका—" ×××× स्वरूपमात्र श्रवणात् अनुरणनं विना नादः श्रुतिरित्युच्यते । प्रथमं हि शब्दो ह्रस्वमात्रस्वरूप एव श्रूयते सैव श्रुतिरित्युच्यते । स्वरारम्भकावयवशब्दविशेषः श्रुतिरिति भावः । "

सं. द. पृ. २०

" श्रुत्यनन्तरभावित्वं यस्यानुरणनात्मकः ।
स्निग्धश्च रञ्जकश्चासौ स्वर इत्यभिधीयते ॥ "

सं. द. पृ. २२

टीकाः—" ×××× श्रुतेरनन्तरमेव यो भवतीत्यर्थः । यश्च अनुरणनात्मकः । प्रथमतंत्र्यामाहतायां तद्देशावच्छेदेन यः प्रथमो ध्वनिरुत्पद्यते सा श्रुतिरिति प्रागेवोक्तम् । यस्तु प्रथमध्वनिव्यापको ध्वनिप्रवाहस्तदनन्तरं श्रूयते तदनुरणनं, तदेव आत्मा स्वरूपं यस्य स तथोक्तः । अनुरणनमेव स्वर इति भावः । यश्च स्निग्धः श्रोत्राभिरामः रञ्जको मनोभिरामश्च असौ स्वर इति अभिधीयते कथ्यते । "

सं. द. पृ. २२




अनुक्रमणिका

वरील उताऱ्यांवरून श्रुति म्हणजे रणन अर्थात् प्रथम आघातानें उत्पन्न झालेला ऱ्हस्व नाद व स्वर म्हणजे रणनरूप श्रुतीनंतर ऐकूं येणारा अनुरणनात्मक दीर्घ नाद असें प्राचीन लोकांचें मत आहे हें व्यक्त होतें. असें असून पंडित जोशी हे शास्त्रीय विवेचन करितांना शास्त्रकारांच्या आशयाकडे गजनिमीलिका न्यायानें डोळेझांक करून रामामात्याच्या मूळ श्लोकाचा उतारा न देतां त्याच्यावर चुकीचा आरोप करितात !

आतां सतराव्या शतकापर्यंत याबद्दलच्या कल्पना बऱ्याचशा चुकीचा होत्या असें म्हणून—" यथाप्सु चरतां मार्गो " इत्यादि श्लोक देऊन त्याचा उपहास केला आहे. परंतु तो श्लोक कोणत्या ग्रंथांतला हें मुळींच सांगितलें नाहीं. तो श्लोक नारदीय शिक्षेंत पृ. ४ वर आहे. त्याचा अर्थ पंडित जोशी यांस समजला नाहीं म्हणून त्यांनी त्याचा उपहास केला आहे. त्या श्लोकाचा अर्थ असा आहे. ज्याप्रमाणें पाण्यांत फिरणाऱ्या माशांचा किंवा आकाशांत उडणाऱ्या पक्ष्यांचा मार्ग निराळा दिसत नाहीं त्या प्रमाणें स्वरांतली श्रुति निराळी दिसत नाहीं. " अर्थात् पाणी आणि माशांचा मार्ग तसेंच आकाश आणि पक्ष्यांचा मार्ग हे जरी भिन्न आहेत तरी ते निराळे करून दाखवितां येत नाहींत. त्याचप्रमाणें श्रुति व स्वर भिन्न असले तरी गळ्यांत ते निराळे करून दाखवितां येत नाहींत. याकरितांच संगीतरत्नाकर-टीकेंत कल्लिनाथानें असें म्हटलें आहे.

" शरीरे प्रतिस्थानमुक्तसंख्यांकनाडीसन्निवेशस्य तत्तच्छ्रुत्या नादस्य च परोक्षत्वात् तत्तत्सद्भावे संदेहः स्यात् इति तन्निरासार्थं प्रत्यक्षतः संवादयितुं प्रतिज्ञाय निर्दिशति–" व्यक्तये कुर्महे तासां वीणाद्वन्द्वे निदर्शनम्। "

सं. र. स्वराध्याय पृ. ३३ श्लो. ११

सिंहभूपालानेंही असें म्हटलें आहे—

" दृष्टान्तेन विना एते नादविशेषाः दुखबोधाः कण्ठेऽपि दर्शयितुमशक्याः। तस्मात् वीणाद्वन्द्वदृष्टान्तकथनं प्रतिजानीते "व्यक्तये" इति.

सं. र. सिंहभूपालटीका पृ. ४२ श्लो. १०

तेव्हां " यथाप्सु चरतां " इत्यादि नारदी शिक्षेंतील श्लोक चुकीचा नाहीं. शास्त्रसिद्धांताला अनुसरून आहे. पंडित जोशी यांना त्याचा आशय न समजल्यामुळें तो उपहासास्पद वाटला. " सतराव्या शतकापर्यंत श्रुति व स्वर याबद्दलच्या कल्पना बऱ्याचशा चुकीच्या होत्या. " हें त्यांचें विधान वरील विवेचनावरून अयथार्थ ठरतें हें वाचकांच्या लक्षांत येईलच.

यापुढें पं. जोशी म्हणतात—

" स्वरो रञ्जयति श्रोतृचित्तम् " या व्याख्येंतील स्वारस्य नीटसें समजत नाहीं. ( पृ. ३३ पं. ५ ) मूळ स्वरमेलकलानिधि ग्रंथांत " स्वतः " (स्वरमे. क. पृ. पं. ५ ) असा पाठ असून, पंडित जोशी यांनीं त्याबद्दल " स्वरः " असा स्वकपोलकल्पित पाठ केल्यामुळें त्यांना या वाक्याचा अर्थ लागला नाहीं. यापुढें पंडित जोशी संगीत न्यायाधीश बनून पुढील निर्णय सांगतात—

" रत्नाकर ग्रंथाचा शुद्ध स्वरमेल मुखारी असें पंडित आपल्या ग्रंथांत स्पष्ट म्हणतो. तेव्हां रत्नाकराचा शुद्ध मेल मुखारी नसून निराळा आहे असें लिहिणाऱ्यावर पुराव्याचा बोजा येतो हें सांगणें नकोच, " पृ. ३३ पं. ७.

हा निर्णय अपूर्व पांडित्याला शोभणार नाहीं असें कोण म्हणेल ? रामामात्यानें कारणें देऊन श्रुति वगैरेविषयीं मांडलेलीं विधानें पंडित जोशी चुकीचीं ठरवितात. आणि रत्नाकराचा शुद्धमेल मुखारी आहे असें कारणें न देतां, त्यानें केलेलें विधान मात्र आपल्या पूर्वग्रहांस अनुकूल असल्यामुळें तें पुराव्याशिवाय यथार्थ ठरवून, फक्त त्याच्या प्रतिपक्षावर पुराव्याचा बोजा टाकतात. अशा प्रकारच्या न्यायपद्धतीनें यापुढें कोर्टात वादीला आपल्या विधानांच्या समर्थनार्थ पुरावा देण्याची गरज मुळींच राहणार नाहीं. त्यानें कोर्टात दावा मांडिला म्हणजे झालें. सर्व पुराव्याचा बोजा प्रतिवादीवरच पडणार. हा एक पंडित जोशी यांच्या विचित्र न्यायाचा मासला आहे.



आतां प्राचीन शास्त्रकार अज्ञान होते असें दाखविण्या-करितां पंडित जोशी यांनीं पुढील विधान केलें आहे.

" मेलांतून राग निघतात या वाक्यावरूनच हें सिद्ध होतें कीं, मेल आधीं व राग मागून उत्पन्न झाले. मेलाला जनक व रागाला जन्य ही परिभाषा युक्तिसंगत दिसत नाहीं. रागाच्या वर्गीकरणाकरितां मेलाची योजना आहे. तेव्हां मेल जनक व राग जन्य कसे ? "

भा. सं. द्वै. पृ. ३३ पं १०

यांत " मेलांतून राग निघतात " या वाक्याचें मूळ संस्कृत वाक्य दिलें नाहीं. किंवा त्याचा स्थाननिर्देशही केला नाहीं. कारण, पंडितजींची वहिवाटच अशी आहे. असो. त्यांनीं मेल आधीं व राग मागून उत्पन्न झाले असें शास्त्रकारांच्या सुदैवानें कबूल केलें आहे. जर मेल प्रथम आणि राग त्या मेलांतून मागून उत्पन्न झाले असें कबूल केलें, तर मेल हे रागाच्या उत्पत्तीचें कारण झाल्यामुळें ते जनक व राग हे मेलापासून उत्पन्न होत असल्यामुळें ते काय म्हणजे जन्य असें तर्कपद्धतीनें सिद्ध होतें. न्यायशास्त्राच्या परिभाषेंत कार्यकारणभावाला जन्यजनकभाव अशीही संज्ञा आहे. परंतु पंडित जोशी यांनीं न्यायशास्त्रांतील हा परिभाषिक अर्थ लक्षांत न घेतल्यामुळें जन्यजनकसंबंध म्हणजे व्यावहारिक बाप-लेकांचा संबंध लक्षांत आणिल्यावरून त्यांना मेल आणि राग यांच्याविषयींची जन्यजनक ही परिभाषा विसंगत वाटली असें म्हणावें लागतें. " रागाच्या वर्गीकरणाकरितां मेलाची योजना आहे " या विधानाला कांहीं आधार दिला नाहीं. परंतु संस्कृत व्याकरणशास्त्रांतील धातूंच्या वर्गीकरणाकरितां योजना केलेल्या भूवादि गणाचा दृष्टांत दिला आहे. व्याकरण-शास्त्रांत ज्या धातूंला एक सामान्य नियम लागू होतो त्यांचा एक समुदाय करून गण ही संज्ञा दिली आहे. ते धातू त्या गणापासून उत्पन्न झालेले नाहींत. परंतु अनेक धातुरूप व्यक्ति मिळून गण होतो. मेल हे रागाचे उत्पादक आहेत. केवळ रागाचा समुदाय म्हणजे मेळ असा सिद्धांत नाहीं. तेव्हां पंडित जोशी यांनीं दिलेला दृष्टांत विसंगत आहे. याप्रमाणें पंडित जोशी यांच्या प्रस्तुत लेखांतील कांहीं शास्त्रविरुद्ध विधानांचें परीक्षण केलें.

या द्वैमासिकाच्या जानेवारीच्या अंकांत त्यांनीं पंडित पुंडरीक विठ्ठल याच्या ग्रंथावर एक लेख लिहिला आहे. ( पृ. ३३ ) तो मीं वरवर पाहिला. त्या लेखाचें परीक्षण मी आज करीत नाहीं. तथापि, त्यांतील एक ढोबळ चूक त्यांच्या नजरेस आणितों. सदहू लेखांत– " पूर्ण व अपूर्ण कूट ताना नष्ट" ( पृ. ३६ पं. १४ ) असें वाक्य आहे. हें वाक्यच पूर्ण किंवा अपूर्ण, किंवा चुकीचें आहे हें समजण्यास मार्ग नाहीं. कारण तेथें त्यानीं मूळ संस्कृत वाक्य दिलें नाहीं. त्या वाक्याचा अर्थ करण्याचा प्रयत्न केल्यास पूर्ण व अपूर्ण कूट ताना नष्ट झाल्या, असा विचित्र व विसं-गत अर्थ होतो. यामुळें हें वाक्य दुर्बोध आहे असें कोणासही दिसेल. तरी हें वाक्य चुकलें असल्यास त्या चुकीची दुरुस्ती, किंवा तें बरोबर असल्यास त्याचा अर्थ पंडित जोशी यांनीं पुढच्या अंकांत प्रसिद्ध केल्यास वाचकवर्गावर त्यांचे उपकार होतील.





# विजयनगरच्या दरबारीं गाजलेले अनेक माधव

[ लेखकः—**शणै गोंयबाब** ]

## लेखांक ४ था

**चवथा माधवः**— ह्याचें नांव **वसंतमाधव**. इ. स. १३६६ त ज्या गोमन्तकस्थ ब्राह्मणांनीं आपली मायभूमि मुसलमानांच्या जुलमी सत्तेंतून सोडविण्याचा यशस्वी प्रयत्न केला, त्यांत **वसंतमाधव** व **माइंशणै वागळे** हे दोघे प्रमुख होते. त्यांच्या खटपटीमुळें पहिल्या बुक्करायानें आंगिरस गोत्री माधवमंत्र्याला कोंकणांत पाठवून तेथें दृढमूल झालेल्या मुसलमानांस पिटाळून लावलें. वसंतमाधव शूर योद्धा असून मुत्सद्दी होता.[1] त्याचे उल्लेख खालीं दिल्याप्रमाणें आढळतात.

**पहिला उल्लेखः**–इ.स. १३७९च्या(शक १३०१, सिद्धार्थी, भाद्रपद ) ईशरापुरच्या शिलालेखांत म्हटलें आहे कीं हस्तिनावति–विजयानगरींत ( दुसरा ) हरिहर राज्य करीत असतां त्याचा मुलगा महामंडलेश्वर चिक्कराय वोडेयर हा आरग-गुत्तीचा प्रतिहस्त असून त्याचा महाप्रधान वसंतमाधव होता. तो शत्रुराजांना थरथरां कांपविणारा, त्यांच्या मस्तकांत शूळ उठविणारा, तीन राजांमध्यें प्रमुख, तुर्क सैन्याचा नाश करणारा, दास्यांत पडलेल्यांना सोडविणारा, दुष्टांचा निग्रह करणारा, शिष्टांचें पालन करणारा, देव, ब्राह्मण व जीर्ण धर्म ह्यांचा उद्धार करणारा, शरण आलेल्यांस वज्राच्या पिंजऱ्याप्रमाणें आश्रय देणारा असा होता. चिक्करायाचा महाप्रधान ह्या नात्यानें तो आरग-गुत्तीच्या ३६ प्रांतांचा कारभार सुखा-समाधानानें चालवीत होता.[2]

**दुसरा उल्लेखः**— इ. स. १३९६ च्या ( शक १३१८, धातृ, आषाढ) सुरहोन्नेच्या शिलालेखांत त्याला **गोवापुरवराधीश्वर** हें बिरुद लावून तो (दुसऱ्या) हरिहराचा महाप्रधान, तुर्क सैन्याचा नाश करणारा, सात कोंकणांची धूळ उडविणारा, कदंबांना लुटणारा व कदंब-पुरच्या लोकांचें रक्षण करणारा असें म्हटलें आहे. ह्या शिलालेखांत त्याचा मुलगा बाचण्णराय ह्याला 'आत्रेय-गोत्रकुलोद्भव' म्हटलें आहे.[3] ह्यावरून वसंतमाधवाचें **अत्रि** गोत्र होतें हें निर्विवाद आहे. गोवापुरवराधीश्वर हें बिरुद कुडाळकार, केळोशीकार, साष्टीकार, बारदेसकार, पेडणेंकार इत्यादि ब्राह्मणांच्या बिरुदांप्रमाणें असून त्यांवरून तीं लावून घेणारांच्या मूळ वसतिस्थानाचा बोध होतो. गोवापुरवराधीश्वर ह्याचा अर्थ गोवापुरकार असा होतो. गोवापुर म्हणजे गोमन्तकांतील तीसवाडी बेटांतील सांप्रतचें **व्हडलें गोंय**. वसंतमाधवाचें हें मूळ वसतिस्थान असल्यामुळें तो व त्याचा मुलगा बाचण्णराय हे स्वतःला गोवापुरवराधीश्वर असें म्हणवीत असत.[4]

---

१. गोंयकारांची गोंयाभायली वसणूक, मुंबै १९२८, खंड १, पा. १०५–१०७.

२. श्रीवीरहरिहररायरु हस्तिनावतिय दुर्गद विजयानगरिय पट्टणद नेलेवीडिनोळु....राज्यं गेय्युत्तं इद्दल्लि। आ **हरिहररायन कुमारनू** श्रीमन्महामंडलेश्वर **चिक्करायवोडेयरु** आरगदल्लि मूवत्तारुकंपणवनू...राज्य माडुवकालदल्लि तत्पादपद्मोपजीवी **श्रीमन्महाप्रधानम् अरिरायभयंकरम् मूवररायरगंड तुरुकदळविभाड वैरिरायमस्तकशूळ...बंदिविमोचन दुष्टनिग्रह शिष्टप्रतिपालक देवब्राह्मणजीर्णधर्मोद्धारक शरणागतवज्रपंजर श्रीवीर वसंतमाधवरायनु आरग-गुत्ति-मूवत्तारु कंपणवनू आरगदपट्टणदल्लि** सुख-संकथाविनोददिं राज्यं माडुवकालदल्लि...Epi. Carn. vol. 7, **होन्नाळि तालुक** Insc. No. 84 on stone at ईशरापुर, p. 308.

३. **श्रीवीरहरिहरमहारायरु**...राज्यं गेय्युत्तं इर्दल्लि तत्पादपद्मोपजीवि **श्रीमन्महाप्रधान तुरकदळविभाड सप्तकोंकणधूळीपट्ट कदंबसूरेकार कदंबपुरजनप्रतिपालन गोवापुरवराधीश्वर श्रीवीरवसंतमाधवरायर** कुमार...**आत्रेयगोत्रकुलोद्भवन्** अह **बाचण्णरायरु गोवापुरवराधीश्वर** ...Epi. Carn. vol. 7, होन्नाळि तालुक Insc. No. 71 on stone at सुरहोन्ने, pp. 305–306.

४. गोंयकारांची गोंयाभायली वसणूक, खंड १, पा. ११२.





अनुक्रमणिका

लोटलीचे राष्ट्रकूटही स्वतःला लत्तलूरपुरवराधीश्वर ( लोटलीकार ) म्हणवीत असत हें त्यांच्या कोरींव लेखांवरून स्पष्ट दिसतें.[५]

**तिसरा व चवथा उल्लेखः**—इ. स. १३८७ ( शक १३०९ ) च्या एका शिलालेखांत **गोव्याच्या माधवरायानें** कुक्के गांवच्या देवळास कांहीं जमीन दान दिली असें म्हटलें आहे. कुक्के गांव हल्लींच्या दक्षिण कर्णाटकांत उप्पिनंगडी तालुक्यांत सुब्रह्मण्य डोंगराच्या नजीक आहे. त्याच तालुक्यांतील बिळिनिळि गांवच्या गोपाळकृष्णाच्या देवळांत एक ताम्रपट आहे. त्यांत **गोव्याचा राजा महादेव** ह्यानें प्रभव संवत्सरांत ( शक १३०९ = इ. स. १३८७ ) देवाला कांहीं दान दिल्याचा मजकूर आहे. शिलालेखांतील माधवराय व ताम्रपटांतील महादेव ह्यांच्यासंबंधानें वापरलेला ' गोव्याचा ' हा शब्द गोवापुरवराधीश्वर ह्या अर्थी आहे ह्यांत शंका नाहीं. नांवाच्या व बिरुदाच्या सादृश्यावरून माधवराय, महादेव व वसंतमाधव हीं एकाच व्यक्तीचीं नांवें होत. ह्यावरून १३८७ त दुसऱ्या *हरिहराचा प्रतिहस्त ह्या नात्यानें दक्षिण कर्णाटकाचा कारभार चालवीत असतां वसंतमाधवानें वरील दानपत्रें* दिलीं असें दिसतें.[६]

*रा.रा. बंगलोर सूर्यनारायण* राव, बी. ए., एम. आर. ए. एस., ह्यांनीं आपल्या विजयनगरच्या इतिहासांत वसंतमाधव व माधवमंत्री ह्या दोन व्यक्ति भिन्न नसल्याप्रमाणें दाखविलें आहे.[७] परंतु तें बरोबर नाहीं. *वर दुसऱ्या उल्लेखांत सांगितल्याप्रमाणें* वसंतमाधवाचें गोत्र **अत्रि** असून माधवमंत्र्याचें गोत्र **आंगिरस** होतें. ह्यावरून ह्या दोन्ही व्यक्ति भिन्न ठरतात.

*रा. रा. आर. राम राव*, बी. ए., ह्यांच्याही मतें वसंतमाधव व माधवमंत्री ह्या दोन व्यक्ति भिन्न नाहींत. तथापि वसंतमाधवाचा मुलगा बाचण्ण ओडेयर ह्याचें गोत्र आत्रेय असलेलें पाहून ते विचारांत पडतात. बापाचें गोत्र आंगिरस असतां मुलाचें गोत्र आत्रेय कसें व्हावें हा प्रश्न त्यांना नडतो. शिलालेखांत तर **'श्रीवीरवसंतमाधवरायरकुमार.....आत्रेयगोत्रकुलोद्भवन् अह बाचण्णरायरु '** असें स्पष्ट म्हटलें आहे. ह्या अडचणींतून निसटण्यासाठीं ते म्हणतात कीं, एथें ' कुमार ' शब्दाचा अर्थ मुलगा नसून प्रीतिपात्र किंवा आश्रित असावा. ह्यासाठीं ते दोन उदाहरणें देतात. सोमनाथपुरच्या देवळांतील शिलालेखांत सोमय्य दण्णायक नांवाच्या इसमाला दुसऱ्या ( तिसऱ्या ? ) नरसिंहाचा **प्रियपुत्र** म्हटलें आहे;[८] परंतु त्याच लेखांत दुसऱ्या ठिकाणीं त्याच्या जन्मदात्या बापाचें नांव वेगळेंच दिलें आहे. त्याचप्रमाणें कुवरलक्ष्म नांवाच्या एका व्यक्तीला बल्लाळ राजाचा मुलगा म्हटलें आहे; तथापि तो त्याचा खरा मुलगा नव्हता. कदाचित् असेंही असेल कीं बाचण्णराय हा जरी वसंतमाधवाचा मुलगा असला, तरी तो दुसऱ्या कोणाला दत्तक दिला असल्यामुळें हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें त्यानें आपलें गोत्र बदललें असावें[९].' परंतु हें समर्थन समाधानकारक *दिसत नाहीं; आपणास इष्ट असलेला* अर्थ कसा तरी *ओढून ताणून बसविण्याचा हा एक प्रकार* आहे. वरील शिलालेखांत कुमार शब्दाचा अर्थ प्रियपात्र किंवा आश्रित असल्याचा पुरावा कोठेंच मिळत नाहीं. विजयनगरचे वरेच कोरींव लेख मीं तपासून पाहिले. त्यांत कुमार शब्द पुष्कळ ठिकाणीं आला असून त्याचा अर्थ **औरस पुत्र** असाच होतो. उदाहरणार्थ, 'श्रीवीरबुक्करायनकुमार हरिहरराय,' 'श्रीवीरहरिहररायनकुमार देवरायरु' 'श्रीत्रीरबुक्करायनकुमार यदुगिरिय विरुपण्ण वोडेयर, ' ' हरिहररायनकुमारनू श्रीमन्महामंडलेश्वर

५. गोंयकारांची गोंयाभायली वसणूक, खंड १, पा. ३४.

६. गोंयकारांची गोंयाभायली वसणूक, खंड १, पा. १०६–१०७.

७. A History of विजयनगर, the Never to be Forgotten Empire, by B. Suryanarain Row, Madras 1905, p. 234.

८. होशळ भुजबल **श्रीवीरनरसिंह देवरसरु दोरसमुद्र** नेलेवीडिनोळ......पृथ्वीराज्यं गेवुत्त इर्द्दलि **तम्म प्रियपुत्रर** आद **सोमय दण्णायकरु** Epi. Carn. vol 3, तिरुमकूडलु—नरसीपुर तालुक insc. N.97, at **सोमनाथपुर**, on stne, **शक** ११९२, शुक्ल, आषाढ ( इ. स. १२७० ), p. 167.

९. Quarterly Journal of the Mythic Society, Second Series, vol. 19, No. 4, April 1929, p. 263.



चिक्कराय वोडेयरु' वगैरे[१०]. ह्यावरून, वसंतमाधवाच्याच बाबतींत त्याच्या 'कुमारा'ला म्हणजे बाचण्णरायाला त्याचा मुलगा न म्हणतां प्रीतिपात्र किंवा आश्रित म्हणण्याचें मुळींच कारण दिसत नाहीं. तो कोणाचा तरी दत्तक असल्याचेंही अनुमान टिकत नाहीं. कारण दत्तक असल्यामुळें तो जर आपलें गोत्र बदलण्याची काळजी घेतो, तर त्याबरोबर त्यानें आपल्या बापाचेंही नांव बदलण्याची काळजी घ्यावयास नको काय? हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें दत्तक मुलाचें गोत्र बदलते वेळीं बापही बदलतो; मग बाचण्णरायानें दत्तक झाल्यानंतरही आपल्या पूर्वीच्या बापाचें ( वसंतमाधवाचें ) नांव कां वापरावें तें समजत नाहीं; आणि ज्यापक्षीं त्यानें तें वापरलें आहे त्यापक्षीं तो कोणाचाच दत्तक नसून आपल्या जन्मदात्या बापाचेंच गोत्र त्यानें घातलें आहे ह्यांत शंका नाहीं. ह्यावरून वसंतमाधवाचें गोत्र **अत्रि** असून तो आंगिरस गोत्री माधवमंत्री व भारद्वाज **गोत्री** माधवाचार्य ह्यांहून निराळा हें सहज सिद्ध होतें.

वसंतमाधवाला वर उल्लेखिलेला बाचण्णराय व मल्लप हे दोन मुलगे असून तेही आपल्या बापाप्रमाणें शूर व पराक्रमी होते. वरील १३९६च्या शिलालेखांत बाचण्णरायाला गोवापुरवराधीश्वर हें बिरुद लावून तो हरिहररायाचा महाप्रधान, रंगिणीचा प्रतापी डोंगरी किल्ला जिंकणारा, कोंकण देशाची सुव्यवस्था लावणारा, कदंबराजांच्या सिंहासनावर बसणारा व चंद्रगुत्ति, वनवासी, कोंकण, रंगिणी वगैरे सर्व राज्याचा कारभार सुखसमाधानानें चालविणारा असें त्याचें वर्णन आढळतें.[११] ह्याच वर्षीच्या बंदलिकेच्या शिलालेखांत त्याचें नांव बाचप्प ओडेयर असें देऊन तो गोव्याच्या सिंहासनावर बसून उत्तरोत्तर राज्याचा विस्तार करीत होता असें म्हटलें आहे.[१२] वर जें कदंबराजांचें सिंहासन म्हटलें आहे तेंच हें गोव्याचें सिंहासन होय. एथें पूर्वी हळसीचे कदंबराजे राज्य चालवीत होते. वरील शिलालेखांनंतर तीन वर्षांनीं म्हणजे इ. स. १३९९ त कोरलेल्या धारवाड जिल्ह्यांतील मकरवळ्ळीच्या शिलालेखांत त्याचें नांव वीर बाचण्ण वोडेय असें असून तो गोव्याचा कारभार चालवीत होता असें म्हटलें आहे.[१३]

बाचण्णरायाच्या वरील तीनही लेखांवरून असें दिसतें कीं, पहिल्या हरिहराच्या व्यवस्थेप्रमाणें, इ. स. १३४६ च्या सुमारास, मारपरायानें विजयनगरच्या साम्राज्याच्या पश्चिम भागावर चंद्रगुत्ती नांवाची जी राजधानी केली होती,[१४] तिच्याऐवजीं त्या शतकाच्या अखेरीस **गोवापुर (ठहडलें गोंय** ) ही राजधानी करण्यांत येऊन, तेथून पश्चिम साम्राज्याचा कारभार चालविण्यांत येऊं लागला. ही नवीन योजना बहुधा वसंतमाधवानेंच केली असावी. तो स्वतः अस्सल **गोमन्तकीय** असल्यामुळें, पुरातन काळापासून यशोदुंदुभीनें गाजणारी आपली मायभूमि सिंहासनाविरहित असणें त्याला न आवडून त्यानें चंद्रगुत्तीचें सिंहासन गोवापुरास आणलें; शिवाय, जलमार्गावरील व्यापाराचें उत्कृष्ट बंदर ह्या दृष्टीनें गोवापुराचें महत्त्व मोठें असून, त्याच्यावर बाहमनी सुलतानांचा

---

१० Epi. Carn. vol. 8, सोरब तालुक Insc. No. 116 at हिरे-आवलि on stone, शक १३११, p. 30; सोरब तालुक Insc. No. 107 at हिरे-आवलि on stone, शक १३२९, p. 28. Epi. Carn. vol. 6, कोप्प तालुक Insc. No. 30 at भंडिगडे on stone, शक १३००, p. 175. Epi. Carn. vol. 7, होन्नाळि तालुक Insc. No. 84 at ईशरापुर on stone, शक १३०१, p. 308.

११. **श्रीवीरवसंतमाधवरायरकुमार श्रीमन्महामंत्रीश्वरं रंगिणिप्रतापगिरिदुर्गमल्ल कोंकणप्रतिष्ठाचार्य आत्रेयगोत्रकुलोद् भवनू** अह **बाचण्णरायरु गोवापुरवराधीश्वर कदंबराजसिंहासनाधिष्ठितनू** आगि सुखसंकथाविनोददिं राज्यं गेय्युत्तं इर्दल्लि **चंद्रगुत्ति-बनवसे-कोंकण-रंगिणि-मोदलादसमस्त राज्यवनू प्रतिपालिसुत्तं** विद्दलि...Epi. Carn. vol. 7, होन्नाळि तालुक Insc No. 71, on stone at सुरहोन्ने, p. 306.

१२. श्रीजतु **बाचप्प वोडेयरु गोवेय सिंहासन...राज्यं उत्तरोत्तर सलुत्तमिरे.** Epi. Carn. vol. 7, शिकारपुर तालुक Insc. No. 241 on stone at बंदलिके near बनशंकरी temple, p. 244.

१३. JBBRAS., vol. 12, pp. 340-341.

१४. वि. ज्ञा. विस्तार, व. ६३, पृ. ३१४.



डोळा नेहमींच असे; म्हणून तेथें विजयनगरच्या प्रतिहस्ताचें सिंहासन स्थापल्यावर, गोव्याच्या भूमीचें रक्षण उत्तम प्रकारें होऊन मुसलमानांच्या जुलमांतून तो सुटेल असें वसंतमाधवास वाटलें असावें. ह्याप्रमाणें चंद्रगुत्तीचें सिंहासन जरी त्यानें गोवापुरास नेलें, तरी त्या शहराचा मान त्यानें एकदम हिसकावून घेतला नाहीं. त्यानें गोवें शब्दाला चंद्रगुत्ती जोडून 'गोवें-चंद्रगुत्तीचें राज्य' अशी नवी शब्दयोजना प्रचारांत आणली, व १४७० त बाहमनी सरदार महमुद गवान ह्यानें गोवें घेईपर्यंत ती तशीच चालू राहिली, हें त्या वेळच्या कोरींव लेखांवरून स्पष्ट दिसतें.[१५] ह्या योजनेप्रमाणें सिंहासनाचें नांव घालतांना फक्त **'गोवेय सिंहासन'** (गोव्याचें सिंहासन)● व सुभ्याचें नांव घालतांना **'गोवे-चंद्रगुत्तिय राज्य'** किंवा **'गोवे-गुत्तिय राज्य'** (गोवें-चंद्रगुत्तीचें राज्य) असें लिहिण्या-बोलण्याचा प्रघात पडला.[१६] ह्या गोवें-चंद्रगुत्तीच्या राज्यांत त्या काळीं दाभोळ बंदराखालचें दक्षिण कोंकण, घटप्रभेच्या दक्षिणेकडील बेळगांव जिल्हा, धारवाड जिल्हा, उत्तर कर्णाटक व शिमोग जिल्ह्याचा कांहीं भाग एवढ्या प्रदेशाचा समावेश होत असून त्याच्या **शिरोभागीं गोवापुरची राजधानी विलसत होती.** इ. स. १३९५ च्या सुमारास बाचण्णरायानें बाहमनी सुलतानाकडून रंगिणी (रांगणा) किल्ला घेऊन कोल्हापुरचा कांहीं भाग गोवेचंद्रगुत्तीच्या राज्याला जोडला. १३५२ त बाहमनी गादीचा संस्थापक अलाउद्दीन हसन गंगू ह्यानें कऱ्हाड व कोल्हापुर हस्तगत केलें तेव्हां[१७] तो किल्ला बाहमन सत्तेखालीं आला होता. त्यानंतर, १३९५ च्या एका वीरगलावरून समजतें कीं मुसलमानांकडून रंगिणी किल्ला घेत असतां चेन्नेय नायक नांवाचा एका सरदार लढाईंत कामास आला.[१८] ह्यावरून त्याच वर्षाच्या सुमारास त्या किल्ल्यासाठीं हिंदु-मुसलमानांत लढाई जुंपली होती, हें उघड दिसतें. त्यांत बाचण्णरायाला यश आल्यामुळें त्याला १३९६ च्या शिलालेखांत **'रंगिणिप्रतापगिरिदुर्गमल्ल'** हें बिरुद लावलें आहे. चेन्नेय नायक हा बाचण्णरायाच्या हाताखालचा सरदार असावा. रंगिणी ऊर्फ रांगणा किल्ला बराच प्राचीन असून ऐतिहासिक महत्त्वाचा आहे. बाराव्या शतकाच्या अखेरीस कोल्हापुरचा शिलाहार राजा दुसरा भोज ह्यानें बांधलेल्या पंधरा किल्ल्यांपैकीं तो एक असून १६५९ त शिवाजी राजानें विजापुरच्या अदिलशहाकडून तो घेतला.[१९]

बाचण्णरायाचा शेवटचा उल्लेख इ. स. १४०७ (शक १३२९) च्या शिलालेखांत व ताम्रपटांत आढळतो. शिलालेखांत त्याचें नांव बाचण्ण ओडेय असें असून ताम्रपटांत त्याला **गोव्याचा ओडेयर** असें म्हटलें आहे. तो त्या वेळीं मंगळूर राज्याचा कारभार चालवीत होता.[२०] १३८७ त त्याचा बाप वसंतमाधव दक्षिण कर्णाटकाचा कारभार चालवीत होता, हें वर आलेंच आहे.

---

१५. गोंयकारांची गोंयाभायली वसणूक, खंड १, पा. १०८-१०९.

● Epi. Carn. vol. 7, शिकारपुर तालुक Insc. No. 241, p. 244. गोमन्तकांतील नागेशीच्या शक १३३५ (इ. स. १४१३) च्या शिलालेखांत 'गोवेंसिंहासनी' हे शब्द आहेत. JBBRAS. vol. 23, p. 107.

१६. Epi. Carn. vol. 7, शिकारपुर तालुक Insc. Nos. 36-37, 40, pp. 94, 95; Epi. Carn. vol. 8, सोरब तालुक Insc. No. 489, pp. 160-161.

१७. The History of the Bahmani Dynasty, founded on the Burhan-i- Maasir, by Major J. S. King, London 1900 p. 21.

१८. श्रीवीर हरिहररायनु...पृथ्वीराज्यं गेयूवल्लि **चेन्नेयनायकरु रंगिणिय कोबल्लि तुरकर कूडे कादि दळव मुरियल हरिदु हडिमुखद घायदिंद स्वामिकार्यके देहवन् ओप्पिसि कोट्ट चेन्नेयनायकरु श्रीवैकुंठवनु पयदिदरु** Epi. Carn. Vol. 12, तिपुर तालुक Insc. No 44 on a वीरकल at आलबूरु p. 83.

१९. गोंयकारांची गोंयाभायली वसणूक, खंड १ पा. ११०.

२०. गों. गों. वसणूक, खंड १, पा. ११०.



वसंतमाधवाचा दुसरा मुलगा **मल्लप ओडेयर.** ह्याचा उल्लेख असलेले कांहीं कोरींव लेख उपलब्ध आहेत. तो कांहीं काळ उत्तर व दक्षिण कर्णाटकांत कारभार चालवीत होता असें दिसतें. इ. स. १४१९ च्या ( शक १३४१ ) ताम्रपटांत तो बाचण्ण वोडेरचा धाकटा भाऊ असुन (पहिल्या) देवरायाचा महाप्रधान होता व गुत्तिदुर्गाचा कारभार चालवीत होता, असें म्हटलें आहे.[२१] हा गुत्तिदुर्गाचा कारभार म्हणजे गोवें-चंद्रगुत्तीचा कारभार.

**पांचवा माधवः**—ह्याचें नांव **सायणमाधव.** ह्याचा सर्वदर्शनसंग्रह नांवाचा ग्रंथ सुप्रसिद्ध आहे. त्यांत त्याचें नांव **माधवार्य** व **सायणमाधव** असें दिलें असून सायण नांवाच्या दुधसागरांतील कौस्तुभ रत्न अर्थात् सायण वंशांत जन्मलेला असें त्याचें वर्णन आहे. त्याच्या गुरूचें नांव शाङ्‌र्गपाणीचा मुलगा सर्वज्ञविष्णु असें दिलें आहे.[२२] हा गुरु दुसऱ्या हरिहराचा समकालीन होता.[२३] सायणमाधवानें आपला ग्रंथ त्याच्याच कारकीर्दींत लिहिला असावा. माधवार्य ह्या नांवावरून सर्वदर्शनसंग्रहाचें जनकत्व पराशरस्मृतिव्याख्याकार माधवाचार्य ह्यावर लादण्यांत येतें. परंतु माधवाचार्यानें आपल्या ग्रंथांत स्वतःविषयींची जी माहिती दिली आहे, त्यांत आपलें कुळनांव सायण व गुरु सर्वज्ञविष्णु असें म्हटलेलें कोठेंच आढळत नाहीं. ह्यावरून हे दोन माधव परस्परांहून भिन्न आहेत ह्यांत शंका नाहीं. रावबहादुर आर. नरसिंहाचार, एम. ए., ह्यांच्या मतें सायणमाधव ह्याचा अर्थ सायणाचा मुलगा माधव असा असून त्याचा सर्वदर्शनसंग्रह ग्रन्थ माधवाचार्यांच्या काळानंतर निदान एका पिढींत लिहिला असला पाहिजे†. ते म्हणतात, 'माधवाचार्यांच्या व सायणाच्या बापाचें नांव मायण होतें, हें अगदीं सुस्पष्ट आहे. बापाचें नांव प्रथम घालण्याच्या रिवाजाप्रमाणें सायण स्वतःला मायण-सायण म्हणवितो.* सर्वदर्शनसंग्रहांतही आपणास काय आढळतें ? त्यांत कर्त्याचें नांव सायणमाधव म्हणजे सायणाचा मुलगा माधव असें आहे. तो जर खरोखरच माधवाचार्य असता, तर त्यानें स्वतःला 'मायण-दुग्धाब्धिकौस्तुभ' व 'मायणमाधव' असेंच म्हणविलें असतें.[२४] ह्याप्रमाणें सर्वदर्शनसंग्रहकाराला ते माधवाचार्यापासून भिन्न समजतात खरें; परंतु त्या उभयतांचें नातें जुळवूं पाहतात तें बरोबर नाहीं. सर्वदर्शनसंग्रहाच्या बापाचें नांव सायण असें ठरविल्यावर हा सायण व माधवाचार्यांचा भाऊ सायण ह्या दोन व्यक्ति एकच समजून सर्वदर्शनसंग्रहकाराला ते माधवाचार्यांचा पुतण्या बनवितात. परंतु हा त्यांचा मुद्दा टिकत नाहीं. कारण माधवाचार्यांच्या सायण भावाला माधव ह्या नांवाचा मुलगाच मुळीं नव्हता. त्याच्या मुलाचें नांव **मायण** असून तें त्याला त्याच्या आजोबाच्या स्मरणार्थ ठेवलें होतें असें दिसतें. स्वतः सायणानें अलंकारसुधानिधींत आपल्या दुसऱ्या मुलाचें नांव **मायण** असेंच दिलें आहे.[२५] ह्या अडचणींतून पार पडण्यासाठीं ते

२१. महाराजाधिराज श्रीवीरप्रताप **देवराय** तत्पादपद्मजीविगनु **बाचण्ण वोडेर तम्मंदिरु महाप्रधानि मल्लप्पोडेरु गुत्तिदुर्गवनु** माडुतिप्प कालदोळु. Epi. Carn, Vol. 7, शिकारपुर तालुक Insc. No. 288 at मुगुलगेरे, p. 259.

२२. **श्रीशाङ्‌र्गपाणितनयं** निखिलागमज्ञं। **सर्वज्ञ विष्णु गुरुमन्वहमाश्रयेऽहम्। श्रीमत्सायण-दुग्धाब्धिकौस्तुभेन** महौजसा। क्रियते **माधवार्येण सर्वदर्शनसंग्रहः**। पूर्वेषामतिदुस्तराणि सुतरामालोड्य शास्त्राण्यसौ। **श्रीमत्सायणमाधव** प्रभुरुपन्यास्थत् सतां प्रीतये। इति **सायणमाधवीये** सर्वदर्शनसंग्रहे चार्वाकदर्शनम्। सर्वदर्शनसंग्रह edited by पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर, Calcutta 1858, pp. 1, 7.

२३. Ind. Ant., Vol. 45, p. 21.

† Ind. Ant., Vol. 45, p. 21.

* तस्य मंत्रिशिरोरत्नमस्ति **मायणसायणः**। तेन **मायणपुत्रेण सायणेन** मनीषिणा। प्रायश्चित्तसुधानिधि, Ind. Ant. Vol. 45, p. 2.

२४. Ind. Ant., Vol. 45, p. 20.

२५. तत्संव्यंजय कंपण व्यसनिनः संगीतशास्त्रे तव।
प्रौढिं **मायण** गद्यपद्यरचनापांडित्यमुन्मुद्रय।
शिक्षां दर्शय शिंगण क्रमजटाचर्चासु वेदेष्विति। **स्वानूपुत्रानुपलालयन् गृहगतः सम्मोदते सायणः।**
अलंकारसुधानिधि, Ind. Ant. Vol. 45, p. २३.








अनुक्रमणिका

म्हणतात, 'कांचीवरमच्या अरुळाळ पेरुमाळ देवळांतील कोरींव लेखांत पराशरस्मृतिव्याख्याकार माधवाऐवजीं मायण हें नांव दिलें आहे. ह्यावरून माधवाचें मायण हें अपभ्रष्ट रूप असून, सर्वदर्शनसंग्रहांतील माधव व अलंकारसुधानिधींतील मायण ह्या दोन व्यक्ति एकच मानतां येतात.[२६]' ह्या मुद्द्याच्या समर्थनार्थ ते आणखीही सांगतात, 'सर्वदर्शनसंग्रहाच्या हस्तलिखितांत पातंजलदर्शनाच्या शेवटीं एक वाक्य आढळतें, तें असें कीं, शांकरदर्शनाचा दुसऱ्या ठिकाणीं विचार केला असल्यामुळें तें एथें गाळलें आहे,[२७] व शांकरदर्शनाच्या समाप्तींत तें सायणानें रचलें असल्याचें म्हटलें आहे.[२८] ह्यावरून अनुमान करितां येतें कीं, सायण बापानें शांकरदर्शनाची चर्चा इतरत्र केल्यामुळें त्याच्या माधव मुलानें आपल्या ग्रंथांत त्यासंबंधानें लिहिण्याचें गाळलें[२९].' आतां अरुळाळ-पेरुमाळ देवळांतील लेख वाचून पाहतां त्यांत 'मायण' शब्दाविषयीं संशयच दाखविला आहे. तो शब्द तेथें केवळ तर्कानें कंसांत दिला आहे.[३०] तो बिनचूक असेलसें दिसत नाहीं. दुसरें, माधवाचार्याच्या बापाचें नांव मायण असल्यामुळें त्याचेंही तेंच ( मायण ) नांव असणें शक्य नाहीं. हिंदु लोकांत बापाचें नांव मुलास ठेवण्याची चाल पूर्वी नव्हती व आजही नाहीं. तिसरें, व्युत्पत्तिशास्त्राच्या नियमांप्रमाणें माधव ह्याचा मायण असा अपभ्रंश होऊं शकत नाहीं. ह्या गोष्टी लक्षांत घेतां, वरील लेखांत माधव हाच अस्सल शब्द असला पाहिजे असें दिसतें. एवढें निश्चित झाल्यावर, सर्वदर्शनसंग्रहाचा कर्ता **माधव** व माधवाचार्याचा पुतण्या **मायण** ह्या दोन निरनिराळ्या व्यक्ति आहेत हें सांगणें नकोच. रावबहादुर आर. नरसिंहाचारांच्या म्हणण्याप्रमाणें सर्वदर्शनसंग्रहकाराच्या बापाचें नांव जरी सायण असलें, तरी तो व माधवाचार्याचा भाऊ सायण ह्या दोन व्यक्ति एकच असल्या पाहिजेत असें ठरत नाहीं. जगांत एकाच नांवाचीं पुष्कळ माणसें असतात. सारांश, सर्वदर्शनसंग्रहकार सायणमाधव ही एक निराळीच व्यक्ति असून तिचा संबंध किंवा नातें माधवाचार्य व सायणाचार्य ह्यांच्याशीं कांहींच नव्हतें ह्यांत संशय नाहीं. रा. रा. महादेव राजाराम बोडस, एम. ए., एलएल. बी., ह्यांनींही रावबहादुर आर. नरसिंहाचारांच्या युक्तिवादाचा अनुवाद केला आहे.[३१] त्याचें निराळें खंडन करण्याची जरुरी नाहीं.

**सहावा माधवः**—ह्याचें नांव **विद्यामाधव.** ह्याचा मूहूर्तदर्शन ऊर्फ मुहूर्तादर्श नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. हा पहिल्या हरिहराच्या कारकीर्दीत हयात असावा. ह्याचेंही ग्रंथकर्तृत्व माधवाचार्यावर लादण्यांत येतें. ह्याचा मुलगा विष्णुशर्मा ह्यानें मुहूर्तदर्शनावर मुहूर्तदीपिका नांवाची टीका रचली आहे. पहिल्या बुक्करायाचा मुलगा मल्लप ह्याचा विष्णुशर्मा हा अश्रित होता.[३२]

संक्षेपशंकरजयाचा कर्ता **माधव** ऊर्फ **नवकालिदास** ह्याचें अल्प वृत्त दुसऱ्या लेखांकांत आलेंच आहे.[३३] तो वरील सहा माधवांहून निराळा होता. त्याला **सातवा माधव** म्हणतां येईल. तोही चवदाव्या शतकांत विजयनगरच्या दरबारीं कदाचित् गाजला असावा. विजयनगरच्या इतिहासाचें संशोधन जसजसें बारकाईनें होत जाईल, तसतसे आणखीही माधव उजेडांत येण्याचा संभव आहे.

---

२६. Ind. Ant. Vol. 45, p. 20.

२७. इतःपरं सर्वदर्शनशिरोमणिभूतं **शांकरदर्शनमन्यत्र निरूपितमित्यत्रोपेक्षितम्.**

२८. इति **श्रीसायणार्यविरचिते** सकलदर्शनशिरोलंकाररत्नं **श्रीमच्छांकरदर्शनं** परिसमाप्तम्।

२९. Ind. Ant. Vol. 45, p. 20.

३०. स्वस्ति श्री। श्रीमायी जननी पिता तव मुनिर्बोधाय [नो] मायणो।
[ज्ये]ष्ठो [**मायण**]...भूपगुरनुजः श्रीभोगन[ा]थः कविः।
Epi. Indica, Vol. 3, p. 118.

३१. वि. ज्ञा. विस्तार व. ६२, पृ. २८१.

३२. **श्रीमन्मल्लभूपः** स जयति जगतीभूषणीभूतधामा।...। किं ब्रूमोऽस्य प्रतापं सुरपतिचकितादींद्ररक्षातिदक्षः।...वीर श्रीधर**बुक्कभूपति**महासाम्राज्यलक्ष्मीकरा—। लंबोदारचरित्रविक्रमरसस्त्रैयंबकालंबनः।

इत्थं **विद्यामाधवीये मुहूर्तादर्शे विद्यामाधवस्यात्मजेन। अ**ध्यायोऽभूद् गुंफितो **विष्णुनाम्ना** वीर्यश्रीर्यं दर्शयन् पंचमोऽयम्। मुहूर्तदर्शनम् विद्यामाधवीयम् Edited by Dr. R. Shama Sastry, B. A., Ph. D., M. R, A. S., Mysore 1923 pp. 3, 380, Preface p. 4.

३३. वि. ज्ञा. विस्तार व. ६३. पृ. ३१०-३११.





अनुक्रमणिका

# वृत्तिसंशोधन

[ लेखकः—रा. रा. **गणेश रामकृष्ण हवलदार**, बी. ए., एलूएल्. बी ]

( मागील अंकावरून पुढें चालू )

**स्नेही नमस्कृतिचमत्कृतिपूर्ण भेट ।**
घेवोनि सांगति " धरा बहु काल नेट." ।
**ही संधि वृत्तहर साधि करी हुशारी।**
**"धंदा नवीन तुमचा कितवा ?"** विचारी ॥११६॥

" चित्रें जुन्यांविषयींचीं मज द्या स्वतंत्र ।
छापीन चित्रमय मी तुमचें चरित्र. ।
तें मूर्तिपूजनचि आवडतें जनांतें. ।
देती न मान जन मानसपूजनातें. ॥ ११७ ॥

छापून वंश संवयींसह वृत्तपत्रीं ।
श्वानांस मूल्य बहु आणिन हीच खात्री. ।
छापीन नाम तव होइल जाहिरात ।
ओलांडुनी अटक गांठिल तें हिरात ! " ॥११८॥

हा ऐकुनी सरस वृत्तहरप्रभाव ।
माझ्या मनांत शिरली सहजींच हांव ।
काढीन कीं नियतकालिक वृत्तपत्र ।
तत्तांस जें विविधवृत्तिस आतपत्र. ॥ ११९ ॥

वार्ताहरास म्हटलें " गुरु दाखवावा ।
ज्याचे धडे गिरवितां म्हणतील वा ! वा !
तेणें अवश्य मम घेउनि कार्य हातीं ।
पत्राधिपास मज भेटविलें प्रभातीं. ॥ १२० ॥

येरू म्हणे " तुज दिसेल पुढें कचेरी ।
तेथें करीं नियत दैनिक एक फेरी ॥
जें जें घडेल व दिसेल समग्र तें तें ।
पाहें तिथें बसुन सेवुन मूकतेतें." ॥ १२१ ॥

आरंभिच्या दिवशिं लेखक तीन येती ।
देती परस्परविरुद्ध मतें नये तीं. ॥
स्वामी " असंशय " म्हणे " मजकूर छापा ।
शोभा अनेकविध रंग सुरेन्द्रचापा ! ॥ १२२ ॥

जें काल, आज मत तें न, दुजें उद्यांना ।
जे पोषिती जन तयां बहुमान द्या ना ! ॥
देती ऋतू सतत रूप नवें नद्यांना, ।
रंगें अनेक सरडा तुकवीत माना. ॥ १२३ ॥

हें पाहिलें परिसिलेंच असेल कानीं ।
कीं ये प्रसिद्धिस नटी बहुभूमिकांनीं. ॥
दत्तात्रयास भजती सगळे त्रिलोकीं ।
त्यातें कशास वद तीन हवींत डोकीं ? ॥ १२४॥

तें शुद्ध गुह्य मत, सात्विक मूळ ज्याचें; ।
धंद्या जनप्रिय असें मत तें रजाचें; ॥
पाहे प्रसंग बदले मत, तें तमाचें; ।
ऐसें त्रिमूर्ति अमुचें मत उत्तमांचें !" ॥ १२५ ॥

सर्वां गमे वच अलंकृत हें प्रशस्य ।
माझें हले शिर, दिसे मुखिं मंद हास्य ॥
"याच्या ' म्हणे अधिप "येइ मनांत किंतु ।
आज्यास हा शिकवि लेखनवर्म नातू !" ॥१२६॥

तों भृंग वृत्तहर पुष्पपुरीं फिरून ।
सोत्साह वृत्तमधु आणि जमा करून. ॥
स्वामी म्हणे " उघड कोश करून दावा ।
ज्याचा पिऊन रस वाचक तृप्त व्हावा." ॥१२७॥

तों वृत्तजीवन वदे "रसपान बावा ! ।
होतें सुखावह सदा अकृपां नबावां ! ॥
वर्णू परंतु अमुची किती दुर्दशा ही ।
घेईल नांदवुन एकच बादशाही. ॥ १२८ ॥

माझे उन्हांत बहु हिंडुनियां कपोल ।
जातात पर्वतदरीसम फार खोल ! ॥
खालीं चटाचट पदीं उडतात लाह्या ।
घर्मा पुसून वरतीं भिजतात बाह्या ! ॥ १२९ ॥



म्यां आणिली परि कशी इरसाल वार्ता ।
ती सेवितां पयहि अप्रिय त्या तृषार्ता ! ॥
नाचून बोट दुखत्री निज गौरजान ! ।
होते बरें गळति मोडुनि शीघ्र मान !" ॥१३०॥

स्वामी म्हणे "उठ ! पळें ! जणुं तूं विमान ।
तीतें पुसें उतरला अथवा विमा न ॥
किंवा न जा, करिल आर्त कुणी तगादा ।
त्याची तृषा हरिन काढुन अंक जादा." ॥१३१॥

वार्ताहरें कथियलें मग अन्य वृत्त ।
" होती पथांत कुतरे लढण्या प्रवृत्त ॥
झालें तयांस कलिकारण शुष्क हाड. ।
सारे करीत असतां जन 'हाड हाड.' ॥ १३२ ॥

ग्रामीण ते धनगरी मृगयाधिकारी ।
साधून बुक्कनविधी भिडती भिकारी. ॥
अंगावरी गुरगुरून कुलीन जाती ।
चावून घेति लचके बहु मिश्रजाती. ॥ १३३ ॥

खाया तयार नव्हता कुणि एक हार ।
केला शिरीं मग जनें लगुडप्रहार. ॥
संपे क्षणांत रण लागति लोक पाठी ।
घेवोनि लाष्ठ अथवा करिं दीर्घ काठी ! ॥१३४॥

तेव्हां लहान कुतरे अथ थोरलाले ।
लांगूल आंत लपवीत भयें पळाले ! ॥
गावांत एक कुतरा उरला असा न ।
ज्या शोभवी न मृदु लेप, न पट्टी सान" ॥१३५॥

स्वामी म्हणे " करिन तें अपुरेंच चोज. ।
युद्धाहुनी अधिक वर्णन हें सतेज ! ॥
आतां प्रमाण मनिं घेउनि विक्रयाचें ।
देईन बक्षिस उद्यां तुज थोर याचें. " ॥१३६॥

माझे मुखीं स्मित बघून म्हणे " कळे हें ।
कीं वाचकांत सगळे जन नेभळे हे ! ॥
आगाउ त्यांस सुचना कर जा भयाची ।
निद्राभरांत भर देतील जांभयांची ॥ १३७ ॥

जा ! गोष्ट सांग मग अस्सल रासभांची ।
त्वद्गौरवार्थ भरतील महासभाची ! ॥
हा संपवा विषय होउनियां कृपाळू ।
संकेत द्या मज यथाकृत सर्व पाळूं" ॥१३८॥

" आज्ञा प्रमाण " म्हणुनी उठुनी अगर्व ।
गेलों निघूनि पुनरागमनाय सर्व. ॥
स्वप्नीं नटी दिसलि विव्हळतां बिचारी ।
श्वानां भितां बघितले बहु पादचारी ॥ १३९ ॥

गेलों कचेरिंत दुजा दिवशीं सकाळीं ।
आला खिळे जुळविणार जसा दुकाळीं ! ॥
बंडी तयास सजवी जिस बंद बारा ।
बारीक तत्तनुस येइ तिनें उबारा ॥ १४० ॥

बांधानि तो उपरणें निज कान झांकी ।
पत्राधिपा कथि "नसे मजकूर बाकी. ॥
ऐशा स्थितींत मन कां न असो सशंक ।
वेळीं प्रसिद्ध करण्या न शकेन अंक" ॥ १४१ ॥

म्हणे स्वामी "कोणी विषय सुचवा निंच मजला ।
उभाराया नाहीं उशिर वरतीं उंच मजला " ॥
कुणी सांगे "स्वामिन्! उदयिक निघे दैनिक नवें ।
तया भावंडाचें उचित लिहिण्या स्वागत हवें." ॥

स्वामी पुसे " म्हणसि काय विदूषकाचें ।
आतांच गौरव करूं गुणदूषकाचें ? ॥
पत्रें जुनीं विफल, नूतन पाहिजेत ।
झालें प्रसिद्ध मनिं हाच धरून हेत ॥ १४३ ॥

भावंड कां म्हणसि ? दाइज जन्मला ना ? ।
नातें गमें शिकविसी पहिल्या मुलांना ॥
यातें नटी प्रसवली अमुच्या मुळींच ।
पारावरी प्रथम ठेव तया मुळींच ! ॥ १४४ ॥

घेई टिपून कथितों तुज अग्रलेख ।
झोंबेल तो मिरचिचें जणु आर्द्र डेंख ॥
नामें विदूषक असें नव वृत्तपत्र ।
थट्टाच एक करण्याकरितां स्वतंत्र ॥ १४५ ॥




अनुक्रमणिका

जन्मास ये. शुभ तया शिमगा मुहूर्त ।
कुंबारवें करिल हृष्ट बटूंस तूर्त. ॥
ऐका भविष्य 'हंसवून दुजा फुकाचें ।
घेईल हें करुन पूर्ण हंसें स्वतांचें !' ॥ १४६ ॥

जी वर्गणी म्हणुन आश्रय घाल याला ।
ती व्यर्थ जेविं अहिला दिधली पयाला ! ॥
कोणी हंसो ! कुणि रुसो कुणि आंठि घालो ।
आम्हीं खऱ्या जनहिता करण्या निघालों.''॥१४७॥

होता खिळे जुळविणार उभा सुखानें ।
तेथें नखें कुडतुडीत हळू मुखानें ! ॥
गेला करांत पडतां मजकूर खालीं. ।
मी भीतिनें जिरविलें हंसुं सर्व गालीं. ॥ १४८ ॥

स्वामी म्हणे ''बघुं मिळे जर अग्रलेख ।
वाचून सर्व म्हणतील जया सुरेख ॥ !''
शोधी खणांत उघडून जुनें कपाट ।
होते तयांत किति लेख पहात वाट. ॥ १४९ ॥

लेखां हवा मिळुनि ते करिती तनाना ! ।
होतां खुला अबहुकाल जसा झनाना !
स्वामी म्हणे ''गवसलीं मज थोर रत्नें ।
मुक्ताफळेंच जणुं पाणबुडयास यत्नें ॥ १५० ॥

हा काय लेख म्हणतो ? 'नृपति स्वदेशी' ।
छापूं यथागत, असो न असो अपेशी ॥
भूपाल हा अवनतिप्रिय, त्या निवारा. ।
सोडा धरा न करिं, तप्त जसा निखारा ! ॥१५१॥

स्त्रीद्यूतमद्यविषयः गतिप्रियाला ।
नांवाजुनी दवडितां पुरता लयाला. ॥
शय्या सपुष्प, सुममण्डपिं दीर्घ न्हाणी ।
स्नानार्थ यास उटणें व गुलाबपाणी ! ॥ १५२ ॥

आराम भूप करि राम म्हणे प्रजा जो ।
निर्मून या नृपतिला विधि कां न लाजो ! '' ॥
बोले पुढें अधिक लेख '' अम्हां पसंत ।
जैसा ऋतूंत ऋतु तो पहिला वसंत ॥ १५३ ॥

कर्तव्यवस्तुस असे कुचलाच जोड ।
ज्याची असे रुचि कडू , परिणाम गोड !'' ॥
ऐसें वदून सहसा कृतनिश्चयानें ।
छापावयास मजकूर दिला तयानें. ॥ १५४ ॥

ताजे निकाल अनपेक्षित शर्यतींचे ।
ते आंख जे भुलविती मन त्या यतीचें ॥
आणी कुणी; अधिप त्या कथि '' छाप जा ! गा !
म्यां राखिली जपुनि यांस्तव रिक्त जागा'' ॥१५५॥

स्वामीस वन्दि कुणि तोंच लवून फार ।
विघ्नां भिवून गमला जणुं सूत्रधार ॥
वन्दीतसे प्रणतहस्त गजाननातें ।
तूं तात, मीं सुत, असें जुळवून नातें ! ॥१५६॥

स्वामी म्हणे '' विविधकर्मसमाकुलासीं ।
आलां कधीं न बसलां, कळलें न मासीं ।
त्याची क्षमा करुन आपण कामकाज ।
घ्यावें करून धरल्याविण भीड आज'' ॥ १५७ ॥

येरू म्हणे '' मम धनी नृपति स्वदेशी ।
मातें निमंत्रुन कथी 'चल जा । सुकेशी ॥
मद्राज्यशासननिवेदक वृत्त रम्य ।
छापीव त्याकडुन ज्यास असेल गम्य. ' ॥१५८॥

आत्मीय मूल्य मनिं आणुनि भूपतीनें ।
आगाउ किंमत दिली शतशः पटीनें. '' ॥
तो कोण हो अधिपतुण्डतलावरील ।
च्छायाविकार बघतां हंसुं आंवरील ? ॥ १५९ ॥

थोपे मुखामुखि, तसा अधिपें मघांचा ।
साराच लेख कटु भूपतिच्या अघांचा ॥
मागीवला परत; हें इतुकेंच नाहीं ।
केली नृपस्तुति तयें लिहुनी पुन्हां ही ! ॥१६०॥

ऊष्मा जसा प्रखर या जगतीं धनाचा ।
नाहीं तसा खचित त्या ज्वलितेन्धनाचा ॥
भस्मावशेष करुनी क्षणिं नीतितत्त्वें ।
साक्षात् अनंगदहना हरवी महत्त्वें ॥ १६१ ॥



म्यां आणिली परि कशी इरसाल वार्ता.।
ती सेवितां पयहि अप्रिय त्या तृषार्ता ! ॥
नाचून बोट दुखवी निज गौरजान ! ।
होते बरें गळति मोडुनि शीघ्र मान !'' ॥१३०॥

स्वामी म्हणे ''उठ ! पळें ! जणुं तूं विमान।
तीतें पुसें उतरला अथवा विमा न ॥
किंवा न जा, करिल आर्त कुणी तगादा ।
त्याची तृषा हरिन काढुन अंक जादा.'' ॥१३१॥

वार्ताहरें कथियलें मग अन्य वृत्त ।
'' होती पथांत कुतरे लढण्या प्रवृत्त ॥
झालें तयांस कलिकारण शुष्क हाड. ।
सारे करीत असतां जन 'हाड हाड.' ॥ १३२ ॥

ग्रामीण ते धनगरी मृगयाधिकारी ।
साधून बुक्कनविधी भिडती भिकारी. ॥
अंगावरी गुरगुरून कुलीन जाती ।
चावून घेति लचके बहु मिश्रजाती. ॥ १३३ ॥

खाया तयार नव्हता कुणि एक हार।
केला शिरीं मग जनें लगुडप्रहार. ॥
संपे क्षणांत रण लागति लोक पाठी ।
घेवोनि लाष्ठ अथवा करिं दीर्घ काठी ! ॥१३४॥

तेव्हां लहान कुतरे अथ थोरलाले ।
लांगूल आंत लपवीत भयें पळाले ! ॥
गावांत एक कुतरा उरला असा न ।
ज्या शोभवी न मृदु लेप, न पट्टी सान'' ॥१३५॥

स्वामी म्हणे '' करिन तें अपुरेंच चोज. ।
युद्धाहुनी अधिक वर्णन हें सतेज ! ॥
आतां प्रमाण मनिं घेउनि विक्रयाचें ।
दईन बक्षिस उद्यां तुज थोर याचें. '' ॥१३६॥

माझे मुखीं स्मित बघून म्हणे '' कळे हें ।
कीं वाचकांत सगळे जन नेभळे हे ! ॥
आगाउ त्यांस सुचना कर जा भयाची ।
निद्राभरांत भर देतील जांभयांची ॥ १३७ ॥

जा ! गोष्ट सांग मग अस्सल रासभांची ।
त्वद्गौरवार्थ भरतील महासभाची ! ॥
हा संपवा विषय होउनियां कृपाळू ।
संकेत द्या मज यथाकृत सर्व पाळूं'' ॥१३८॥

'' आज्ञा प्रमाण '' म्हणुनी उठुनी अगर्व ।
गेलों निघूनि पुनरागमनाय सर्व. ॥
स्वप्नीं नटी दिसलि विव्हळतां बिचारी ।
श्वानां भितां बघितले बहु पादचारी ॥ १३९ ॥

गेलों कचेरिंत दुजा दिवशीं सकाळीं ।
आला खिळे जुळविणार जसा दुकाळीं ! ॥
बंडी तयास सजवी जिस बंद बारा ।
बारीक तत्तनुस येइ तिनें उबारा ॥ १४० ॥

बांधानि तो उपरणें निज कान झांकी ।
पत्राधिपा कथि ''नसे मजकूर बाकी. ॥
ऐशा स्थितींत मन कां न असो सशंक ।
वेळीं प्रसिद्ध करण्या न शकेन अंक'' ॥ १४१ ॥

म्हणे स्वामी ''कोणी विषय सुचवा निंच मजला ।
उभाराया नाहीं उशिर वरतीं उंच मजला '' ॥
कुणी सांगे ''स्वामिन् ! उदयिक निघे दैनिक नवें ।
तया भावंडाचें उचित लिहिण्या स्वागत हवें.'' ॥

स्वामी पुसे '' म्हणसि काय विदूषकाचें ।
आतांच गौरव करूं गुणदूषकाचें ? ॥
पत्रें .जुनीं विफल, नूतन पाहिजेत ।
झालें प्रसिद्ध मनिं हाच धरून हेत ॥ १४३ ॥

भावंड कां म्हणसि ? दाइज जन्मला ना ? ।
नातें गमें शिकविसी पहिल्या मुलांना ॥
यातें नटी प्रसवली अमुच्या मुळींच ।
पारावरी प्रथम ठेव तया मुळींच ! ॥ १४४ ॥

घेई टिपून कथितों .तुज अग्रलेख ।
झोंबेल.तो मिरचिचें जणु आर्द्र डेंख ॥
नामें विदूषक असें नव वृत्तपत्र ।
थट्टाच एक करण्याकरितां स्वतंत्र· ॥ १४५ ॥



जन्मास ये. शुभ तया शिमगा मुहूर्त ।
बुंबारवें करिल हृष्ट बटूंस तूर्त. ॥
ऐका भविष्य 'हंसवून दुजा फुकाचें ।
घेईल हें करुन पूर्ण हंसें स्वतांचें !' ॥ १४६ ॥

जी वर्गणी म्हणुन आश्रय द्याल याला ।
ती व्यर्थ जेविं अहिला दिधली पयाला ! ॥
कोणी हंसो ! कुणि रुसो कुणि आंठि घालो ।
आम्हीं खऱ्या जनहिता करण्या निघालों."॥१४७॥

होता खिळे जुळविणार उभा सुखानें ।
तेथें नखें कुडतुडीत हळू मुखानें ! ॥
गेला करांत पडतां मजकूर खालीं. ।
मी भीतिनें जिरविलें हंसुं सर्व गालीं. ॥ १४८ ॥

स्वामी म्हणे ''बघुं मिळे जर अग्रलेख ।
वाचून सर्व म्हणतील जया सुरेख ॥ !''
शोधी खणांत उघडून जुनें कपाट ।
होते तयांत किति लेख पहात वाट. ॥ १४९ ॥
लेखां हवा भिळुनि ते करिती तनाना ! ।
होतां खुला अबहुकाल जसा झनाना !
स्वामी म्हणे ''गवसलीं मज थोर रत्नें ।
मुक्ताफळेंच जणुं पाणबुड्यास यत्नें ॥ १५० ॥

हा काय लेख म्हणतो ? 'नृपति स्वदेशी' ।
छापूं यथागत, असो न असो अवेशी ॥
भूपाल हा अवनतिप्रिय, त्या निवारा. ।
सोडा धरा न करिं, तप्त जसा निखारा ! ॥१५१॥

स्त्रीद्यूतमद्यविषय: गतिप्रियाला ।
नांवाजुनी दवडितां पुरता लयाला. ॥
शय्या सपुष्प, सुममण्डपिं दीर्घ न्हाणी ।
स्नानार्थ यास उटणें व गुलाबपाणी ! ॥ १५२ ॥

आराम भूप करि राम म्हणे प्रजा जो ।
निर्मून या नृपतिला विधि कां न लाजो ! '' ॥
बोले पुढें अधिक लेख '' अम्हां पसंत ।
जैसा ऋतूंत ऋतु तो पहिला वसंत ॥ १५३ ॥

कर्तव्यवस्तुस असे कुचलाच जोड ।
ज्याची असे रुचि कडू , परिणाम गोड !'' ॥
ऐसें वदून सहसा कृतनिश्चयानें ।
छापावयास मजकूर दिला तयानें. ॥ १५४ ॥

ताजे निकाल अनपेक्षित शर्यतींचें ।
ते आंख जे भुलविती मन त्या यतीचें ॥
आणी कुणी; अधिप त्या कथि '' छाप जा ! गा !
म्यां राखिली जपुनि यांस्तव रिक्त जागा'' ॥१५५॥

स्वामीस वन्दि कुणि तोंच लवून फार ।
विघ्नां भिवून गमला जणुं सूत्रधार ॥
वन्दीतसे प्रणतहस्त गजाननातें ।
तूं तात, मीं सुत, असें जुळवून नातें ! ॥१५६॥

स्वामी म्हणे '' विविधकर्मसमाकुलासीं ।
आलां कधीं न बसलां, कळलें न मासीं ।
त्याची क्षमा करुन आपण कामकाज ।
घ्यावें करून धरल्याविण भीड आज'' ॥ १५७ ॥
येरू म्हणे '' मम धनी नृपति स्वदेशी ।
मातें निमंत्रुन कथी 'चल जा । सुकेशी ॥
मद्राज्यशासननिवेदक वृत्त रम्य ।
छापीव त्याकडुन ज्यास असेल गम्य. ' ॥१५८॥

आत्मीय मूल्य मनिं आणुनि भूपतीनें ।
आगाउ किंमत दिली शतशः पटीनें. '' ॥
तो कोण हो अधिपतुण्डतलावरील ।
च्छायाविकार बघतां हंसुं आंवरील ? ॥ १५९ ॥

थोपे मुखामुखि, तसा अधिपें मघांचा ।
साराच लेख कटु भूपतिच्या अघांचा ॥
मागीवला परत; हें इतुकेंच नाहीं ।
केली नृपस्तुति तयें लिहुनी पुन्हां ही ! ॥१६०॥

ऊष्मा जसा प्रखर या जगतीं धनाचा ।
नाहीं तसा खचित त्या ज्वलितेन्धनाचा ॥
भस्मावशेष करुनी क्षणिं नीतितत्त्वें ।
साक्षात् अनंगदहना हरवी महत्त्वें ॥ १६१ ॥



वृत्ताधिपांत बनतो जर एक ऐसा ।
मातें तसाच बनवील न काय पैसा ? ॥
आतां समागम न आवडतो तयांचा ।
मातें म्हणो न कुणि बान्धव तोतयांचा. ॥१६२॥

धंदा दुजा उचित काय दुजा करावा ? ।
जावें असेंचि निघुनी अपुल्या घरा वा ! ॥
शिक्षा गमे मुळिंच काम नसे नरा ही ।
माझ्या शिरीं सकळ वेळ बसून राही. ॥ १६३ ॥

मीं काढिली म्हणुनियां नगरांत फेरी ।
तों लागली पथिं गभीरमुखी कचेरी ॥
द्वारीं पुढील बघ कोरिंव एक चित्र ।
सांगावयास बसलें सगळें चरित्र. ॥ १६४ ॥

कोणी डोळस पट्टबद्धनयना स्त्री आंधळ्यासारखी ।
घेई सव्य करीं सुरी कड जिची सव्येंतरें पारखी ॥
तोंडीं ऐकवतात तें समजुनी दे न्यायजी राउळीं ।
न्यायाची म्हणतात ती वळखली ही देवता आंधळी.
॥ १६५ ॥

पाहीना इकडे तसेंच तिकडे व्हावा न पूर्वग्रह ।
न्याया निष्ठुरता शिवो न कधिंही ऐसा जिचा आग्रह॥
देते न्याय खरा जनांस करुणारूपाच जी सांवळी ।
न्यायाची म्हणातत ती वळखली ही देवता आंधळी
॥ १६६ ॥

हें न्यायमंदिर असें कळण्या प्रमाण ।
याच्याहुनी अधिक कोण म्हणेल आण ? ॥
गेलों पुढें सरळ थेट सभागृहांत ।
गर्दीमुळें स्थळ नसे शिरण्यास हात. ॥ १६७ ॥

" बोलूं नका !" " चुप रहा !" म्हणुन प्रभूत ।
लोकां मधून दरडाविति राजदूत. ॥
पाहून सर्वगत संभ्रमयुक्त रीति ।
माझ्या मनीं शिरत आदरयुक्त भीति. ॥ १६८॥

न्यायासनावर नयज्ञ बसे गभीर ।
जो खोल सागरजलासम शांत धीर. ॥
बाजूस पंच बसले न तिथून दूर ।
दोन्ही वकील बसती उठती समूर. ॥ १६९ ॥

आरोपी कठड्यांत निश्चल बसे वेडापिसा होउनी; ।
सांगे साग्रह कोतवाल " चढवा फांशावरी हा
खुनी ! ॥"
आली एक घडून गोष्ट तितक्यामाजी चमत्कारिक ।
वारा येउनि मालवी क्षणिं दिवा होता न जो
नारिक. ॥ १७० ॥

तेवी दूत दिवा पुन्हां दवडिल्या वांचून एक क्षण ।
बोले शीघ्र वकील"तेवुं शकलां ज्योती पुन्हां ही;पण॥
जीवज्योति अखेर मालवुनियां याची तुम्हीं टाकिली ।
तेवाया तिस, मेळवाल गुटिका संजीवनी कोठली !"
॥ १७१ ॥

आरोपी बघुं लागला टकमकां साश्चर्य सर्वोकडे. ।
पंचांतें मनिं वाटलें न अमुच्या हातें घडो वांकडें. ॥
मोठें या समयास तूर्त पडलें न्यायाधिपा सांकडें ।
झाले आतुर लोक साहजिकची संदिग्धता त्यां नडे.
॥ १७२ ॥

घेतां विचार करण्या न पळेंहि पांच ।
आरोप कल्पित असें मत देति पंच. ॥
न्यायाधिपास गमलें मत हेंच युक्त ।
आरोपिला ठरवि तो क्षणिं दोषमुक्त. ॥ १७३ ॥

ऐकून देती जनलोक टाळी. ।
कोणी म्हणे " मृत्युस पंच टाळी. " ॥
न्यायाधिपाची स्तुति गाइ अन्य. ।
मी मानिलें त्या वकिलास धन्य ! ॥ १७४ ॥

धंदा प्रशस्य न दुजा वकिलीसमान ।
मीं तों चुकून दिधला इतरांस मान. ॥
अभ्यास मीं ठरविला मग कायद्याचा ।
केलाच आज सुरु, धीर नसे उद्यांचा. ॥१७५॥

धंदे असे विविध धुंडुनि काढतांना ।
संकेतभंग किति होतिल तें कळेना ! ॥
अभ्यास जो त्यजियला क्षणिं वावडाच ।
तो पथ्यसा उचलिला रणिंचा विडाच ॥ १७६ ॥




अनुक्रमणिका

केले प्रयत्न झटुनी, बनलों वकील. ।
आला विचार पद टाकुं कसें पुढील ? ॥
मातेंच कां अनुभवाविण ते अशील ।
देतील आश्रय, असें जरि सख्यशील ? ॥१७७॥

ज्ञानें, वयें, अनुभवें अधिकार ज्यातें ।
ऐसा वकील करितां गुरु, काय जातें ? ॥
मीं गांठुनी विनविलें असल्या गुणाढ्या ।
'शिष्य प्रपन्न तुमचा मजला धडा द्या.' ॥१७८॥

निरखुनी मजला गुरुजी बघे. ।
उलट उत्तर दे अवधी न घे. ॥
" दिससि तूं शिशु शुद्ध अमायिक. ।
कथिन तें मुख बांधुनि आइक. ॥ १७९ ॥

अभ्यास आधिं करण्यास्तव काय न्हावी ।
आणून पातळ चुना मडक्यास लावी ? ॥
घेऊन शस्त्र सुकल्यावर काय ताशी ? ।
होऊ पुढें कधिं इजा न गिराइकाशीं. ॥ १८० ॥

तीं मस्तकें खरबरीत गिराइकांचीं ।
न्हाव्या कला शिकविण्या मडकींच काचीं ! ।
घेऊन शीघ्र चुळकाभर थंड पाणी ।
न्हावी क्षुरें न घटवी निज काय पाणी ? ॥१८१॥

जे जन्मले असति त्या गुरुपुष्ययोगीं ।
धंद्यास ते वकिलिच्या न हितोपयोगी ! ॥
जन्मास वैधृति अथ व्यतिपात लागे ।
ज्या, तो वकील बनला तर कार्य भागे ! ॥१८२॥

स्वतां स्वतांची करणें प्रशंसा ।
गमे मला जेंविं मुनींस हिंसा ! ॥
रूप स्वहस्तस्थित कंकणाचें ।
पहावया कार्य न दर्पणाचें. ॥ १८३ ॥

येथें तुला पुढतिं जीं दिसती कुळें तीं ।
तातासमान मज मानुनि भेट देती. ॥
चालेल काम बघ, खात मुखें सुपारी ।
न्यायालया इथुन जाउं पुढें दुपारीं" ॥१८४॥

" सांगा पाटिल बा " वकील पुसतो " कां वाट आजी चुके ?" ।
बोले पाटिल " बुद्धिवीण सगळे हे जीव आम्हीं मुके. ॥
शोभा नागर शेतिला,व कुरणा ढोरें, घरा बायको ।
आम्हां संतति, सावकार सकलां, सांगा कुणा तो नको ? ॥ १८५ ॥

औंदा येऊनियां दुकाळ, थकली बाकी, न झाली ढिली ।
दैवी कोपचि नाइलाज म्हणुनी फिर्याद ही ओढली;॥
हसे बांधुनि, सावकार कथितां, देईन जामीन मी ।
देतों जीव गहाण, रक्षण करा. हे पाय हो ! मो नमीं." ॥ १८६ ॥

बोले वकील " मम वाक्य धरा प्रमाण ।
नाहीं दिली कधिंच अक्कल मी गहाण ! ।
उत्कृष्ट कैफियत मी करितों तयार ।
जागीं तिनें थिजुनि जाइल सावकार. ॥१८७॥
सांगा ' कागद हा करून न दिला; माझी नव्हे ही सही. ।
लोकीं अक्षरसाम्य फार असतें' 'ताडून पाहीं वही' ॥
'साक्षी ओळखतात अक्षर कसें ?' 'तें होय वैरामुळें' ।
'नाहीं रक्कम पोंचली, खत जरी तंत्राप्रमाणें जुळें.' ॥ १८८ ॥

'सारी रक्कम मांडिली गणुनियां त्या नोंदणाऱ्या पुढें.' ।
'नेली ती उठतांच तेथुनि तुम्हीं' हा लोक ऐसा लढे ! ॥
ऐसें पाटिल बा ! समग्र वठवा,चित्तीं स्मरा ईश्वरा॥
यत्नें देव व दैव मित्र करुनि मोठ्या यशातें वरा." ॥ १८९ ॥

झाला पाटिल पक्षघातजडधी तो हें न सोसूं शके ।
वाटे वाङ्मय हे तयास मिळती विद्युल्लतेचे धके ! ॥
वन्दूं यांतिल पाटिलास नकळे, निन्दूं वकीलास मी।
आहे ज्ञान बली, न सांगुं शकतों कीं शील आहे कमी. ॥ १९० ॥



तों एक ये त्वरित धांवुनियां अशील. ।
बोले "तुम्हींच अज घालविलें न शील ॥
मी न्यायमंदिरिं बघून अपूर्व लीला ।
अर्पीतसें चरणिं या फुलपाकळीला. ॥ १९१ ॥

घेण्यास बक्षिस तुम्हीं थबकूं नकाच. ।
न्यायाधिपा कळतसे मणि आणि कांच ॥
ठेवोनि खर्च शिरिं तो बुडवीत काज. ।
होतें खरेंच लटिकें न तिथें इलाज. ॥ १९२ ॥

तत्रापि वर्णु कशि हो तुमची चिकाटी ! ।
मुद्दे तुम्हीं उठविलेत भरोनि पांटी ! ॥
वादांत शीघ्र अरिचें मुख वाग्बलानें ।
कलेंत बंद; रणिं तोफ जशी खिळ्यानें. ॥१९३॥

न्यायाधिपें बसविण्यास तुम्हांस खालीं ।
केले प्रयत्न परि ते ठरले अकालीं. ॥
ही थोर कीर्ति पसरेल बरीच दूर ।
रेड्यांपरी लढवितों वकिलांस शूर" ॥ १९४ ॥

बोले वकील हंसुनी "फल येइ कर्मा ।
उत्पन्न होइ मम एक समानधर्मा ॥
त्याकारणें हुडकिली विपुला न पृथ्वी ।
हा कालही निरवधी न विलंब लावी" ॥ १९५ ॥

ऐसें बोलुनियां वकील कळण्या तत्काल माझें मत ।
किंचित् आ करुनी बसे कुतुहलें माझ्याकडे पाहत ॥
दावाया मुखिं विश्वरूप अपुलें शिष्या मला अर्जुना।
वाटे कृष्ण उभा पुढें पुरुष कीं साक्षात् पुराणा जुना ! ॥ १९६ ॥

दंष्ट्रा घांसुनि वाजती कडकडां अक्राळ विक्राळ त्या।
मध्यें येउनि पक्षकार चुरडे ओढोनि ने काळ त्या।
आरोळ्या पडुं लागल्या श्रुतिपथीं मी जाहलों घाबरा।
जोडोनी कर मीं मनांत म्हटलें 'रूप प्रभो आवरा !' ॥ १९७ ॥

माझी इथेंच सुटका करतां न आली ।
याची उगीच उलटी समजूत झाली ॥
माझी नमस्कृति गमे वकिला समर्था ।
केली खरेंच जणुं मी अभिनंदनार्था ! ॥१९८ ॥

होतां दुपार उठलों ठरल्याप्रमाणें ।
न्यायालयास वकिलासह होय जाणें. ॥
एका सभेंत बसलों जन फार लोटे ।
होता तपाशित नयज्ञ हिशोब खोटे. ॥ १९९ ॥

भांडे वकील "दिन हा अज सत्तरावा ! ।
इच्छा असे मनिं, अशील सुखें तरावा. ॥
विश्वास्य साक्षिगण जाड दुजा पुरावा ।
लेख्यप्रमाण असतां नच अंतरावा. ॥ २०० ॥

या हेतुनें बहुत लोक वह्यांसमेत ।
येऊन येथ बसले जमुनी सभेंत. ॥
वादानुवाद, तनुतर्क, तसे वितर्क ।
काढून त्यांत सगळेच वकील गर्क ! ॥ २०१ ॥

जामीन, जप्त्या, किरकोळ अर्ज ।
यांच्या पदीं होत अवश्य कर्ज. ॥
वकील ते ज्येष्ठ कनिष्ठ दोन ।
जे घेति वेळेस अमोज होन. ॥ २०२ ॥

जेरीस येती किति पक्षकार ।
चाले सदाचा तरी हा प्रकार." ॥
न्यायासनारूढ नयज्ञ सांगे ।
सूत्रान्त तें वाक्य मनास लागे ॥ २०३॥

"जेत्यास ये श्रेय पराजिताचें ।
पराजिता येइ तसें मृताचें ! ॥
भांडून खोटें किति हानि पाहें ! ।"
निर्वेद पावे मन ऐकतां हें. ॥ २०४ ॥

न्यायाजिरीं मी वरतीं व खालीं ।
टाकोनियां दृष्टि सभोंवतालीं ॥
गेलों उठोनीं, गमलें विचित्र ।
द्वारीं दिसे कोरिंव एक चित्र ॥ २०५ ॥

देई वानर तोलुनी मउ खवा त्या भांडत्या मांजरां ।
खाई त्यांतिल भाग काढुनि, झुके जेव्हां तुला ती जरा।
अन्तीं शेष नुरे म्हणून बसुनी देई तिथें ढेंकरा, ।
मार्जारद्वय जाय तें परतुनी चोळीत डोळे घरा॥२०६॥



न्यायाधिपाच्या व्यवहारतत्त्वा ।
हें चित्र दार्ष्टान्तिक दे महत्त्वा. ॥
याच्या सवें जें घडलें सकाळीं ।
सारेंच माझ्या मिनलें कपाळीं. ॥ २०७ ॥

डोक्यास लागे बहु होउं जाच. ।
उच्च स्वरें ओरडलों तसाच ॥
" मातें नको ही वकिली सुपीक ।
हीहूनि ती फारचि इष्ट भीक !" ॥ २०८ ॥

माझ्या कुणी हळुच मागुनि एक येत ।
पण्ड्याच यात्रिक धरून जसा गयेंत ! ॥
ऐकून शब्द मम निश्चित निर्णयाचे ।
माझें करीत अभिनंदन गोड वाचे. ॥ २०९ ॥

"सदा जयतु हे ! वकील ! कुशली तुझी भीक ती।
जिच्याविण तुला उरे न दुसरी कुठें सद्‌गति ।
जिनें भुजबळें कृता पृथु मही पदाक्रान्त ती ।
सुशिक्षित समागमें तिचि निघो बरी संतति ॥२१०॥

मीं दावितों तुजसिं नूतन भिक्षुशाला ।
तेथेंच तूं मिळवशील महायशाला. " ॥
मीं घेतला शकुनसा जयशब्द मानें ।
गेलों तयासहित दूर पुढें दमानें. ॥ २११ ॥

नेई मला तो गुरुच्या समीप. ।
जो भासला ज्ञानमय प्रदीप ॥
भाशा तयाला कळतांच हेत ।
म्हणे " न याहून पसंत बेत. ॥ २१२ ॥

धंदा भिकेचा युगकालमानें ।
केला पुराणीं बटु वामनानें ! ॥
श्रीरामदासें इतिहासकालीं ।
तेणें भिकेला पदवी मिळाली. ॥ २१३ ॥

एकें प्रयत्न करूनी धन सांठवावें. ।
न्यावें दुजें हरुनि तें दुरि साठ वावें ! ॥
सायासलब्ध रससंग्रह मक्षिकांचा ।
नेतो दुजा हरुनियां अगदीं फुकाचा. ॥ २१४ ॥

वापी जियेंत भरलें बहु वित्तवारी ।
तीरीं अशिक्षित उभा असुनी भिकारी ॥
खावोनियां धनिक मंदिरिं इष्ट टोले ।
नाहीं समर्थ करण्या निज ओष्ठ ओले ! ॥२१५॥

तोची सुशिक्षित असेल तिथें भिकारी ।
वापीस आटविल तो उपसून सारी. ॥
गालांत कां उठवितोस अनल्प हास्य ? ।
मी सांगतों तुजसि यांतिल तें रहस्य ॥ २१६ ॥

कीं जो भिकारी असता अडाणी ।
नीचोदरावीण मनीं न आणी ॥
हठाग्रहाच्या पुतळ्यास याही ।
जीर्णान्नखण्डाविण काम्य नाहीं ! ॥ २१७ ॥

असे परी शिक्षित जो भिकारी ।
स्वार्था त्यजी जो जनतोपकारी ॥
भरोनियां पोट धरोनि आस्था ।
तो चालवी नित्य अनेक संस्था ! ॥ २१८ ॥

भिक्षेवरी बसविला शिशुरक्षणाचा ।
ऱ्यां संघ नूतन विलंब नसे क्षणाचा ॥
पाजीं शिशूंस पय मी गतमातृकांस !-
तों दे गुरूसचि सशर्कर दुग्ध दास !—॥२१९॥

भिक्षेवरी पुरवण्या उघड्यांस वस्त्र ।
ऱ्यां स्थापिला गण; तुज गमेल करांत अस्त्र. ॥
-देती गुरूस कुणि तों पट उच्चजाति ।
'संतुष्ट व्हा.' म्हणुन जोडुन हस्त जाति- ॥२२०॥

भिक्षेवरी रचुन मंडळ गोड मेवा ।
देतों सरोग जनतेस फळें मुळें वा. ॥
-तों दे कुणी फळफळावळ दीर्घ ताटीं ।
सांगे करून खुण त्या गुरु 'आंत वांटीं'- ॥२२१॥

भिक्षा मागुनियां गरीब वसतीमाजीं रहाती मुलें ।
केलें स्वच्छ तयांस, मेघसलिलें बागेंतलीं कीं फुलें ॥
त्या वेळीं बहुतां पुरून उरलें सामान तें हें गड्या ।
तैलें वासित, दन्तधावन पुड्या, या साबणाच्या
वड्या ! ॥ २२२ ॥








अनुक्रमणिका

येथें नसे कपट, येथ नसे दगा वा ।
लोकें कसा स्वजनसेवक हा न गावा ? ॥
पत्रें जयांत भरलीं नुसती प्रशंसा ।
देती मला धनद मानसराजहंसा ! ॥ २२३ ॥

मी सांगतों उचित हा तुज रोजगार ।
सांगेल कोण तळिराम न रोज गार ? ।
नेतों सवें चल तुला धनिकांकडेसं ॥
त्यांतें कसा बनवितों बघण्यास बैस. ॥ २२४ ॥

मी छिद्र पाडिन हळूच तदीय कोषा ।
पाडूं शकेल न तसें कधिं वारयोषा !" ॥
याच्या मतास दिधला न लवून मान ।
केला निषेध उलटा हलवून मान ॥ २२५ ॥

बोले येरु "मुला ! मला समजसी त्या गाइचा बान्धव ।
जो पाठीवरच्या न घेउं शकतो त्या साखरेची चव ॥
देती दुग्ध दयाळ जें धनिक ते आम्हांस लागे तसें ।
त्याचें वांटुन ताक शेष उरलें लोणी त्यजावें कसें?"२२६

हृद्ग्रन्थिभेद घडला गुरुभाषणानें ।
मी छिन्नसंशय उभा वदलों क्षणानें ॥
" मातें दिलेंत समजाउन जें भिकेचें ।
तें तत्त्व मी उतरवीन कृतींत कैंचें ? ॥ २२७ ॥

मी व्यूहपंडित नसें; कळती न डाव ।
कैसा करीन धनिकांवरती चढाव ?" ॥
येरु म्हणे " जर तुला न मिळेल भीक ।
नाहीं इलाज तर वैद्यक एक शीक." ॥ २२८ ॥

मीं बोललों " मज भला स्मृतिलाभ झाला ।
मानीन, वैद्यक शिकून गुरो ! वचाला " ॥
शोधावयास पुरिं हिंडुन वैद्यसद्मा ।
गेलों निघोन नमुनी गुरु पादपद्मा. ॥ २२९ ॥

शाळा पुढें बघितली पथिं औषधींची ।
होती जुन्यांहुन जुनी नकळे कधींची. ॥
होत्या तिच्या अति विशाल बहिःस्थ भिंती ।
ज्यांचें अलंकरण रंगित जाहिराती. ॥ २३० ॥

तेथें कुणी पथग येउन याद वाची ।
सेनाच रुक्मिगदमारक यादवांची ।
"तो रामबाण निज नेम चुकेल सिद्ध ।
हीं औषधें करिति रोग अचूक विद्ध. ॥ २३१ ॥

सेवा गदारि गुटिका यमभीति टाळा ।
राहील तो नच उभा तुमच्या विटाळा. ॥
कोठें पडेल कलिच्या युगिं सत्य कानीं ।
तें आमुच्या प्रथित औषधिंच्या दुकानीं ! ॥२३२।

मात्रावलेह व कषाय व हीं अरिष्टें ।
इत्यादि भक्षुन बघा टळती अरिष्टें ! ॥
या ! एकवारचि फसा न करून बोंब ।
सांचे तळें पडुनियां जल थेंब थेंब. ॥ २३३ ॥

ज्याचा जसा भरंवसा कथितों न खूळ ।
आहे हिमालयवनोद्भव एक मूळ ॥
त्यातें कडोसरिस लावुन नीट ठेवा ।
लागेल वेळ मिळण्यास न नष्ट ठेवा !" ॥२३४।

अन्तीं वदे पथिक " निर्मून बालिशांला ।
धूर्तांस निर्मि विधि भूवरतीं कशाला ? ॥
ते धूर्त सर्व अथ बालिश सर्व होते ।
होतें बरें, अघ न उद्भवतें अहो तें. ॥ २३५ ।

थोडेच धूर्त परि पुष्कळ बालिशांशीं ।
क्रीडा यथेच्छ करिती सरळाशयांशीं. " ॥
केलें गमे वच तयें असलें न वांयां ।
या धूर्त हस्तिं पडतां मज वांचवाया. ॥२३६॥

साभार त्या विनविलें " मज भेटवावा ।
वैद्य-क्रियाकुशल शुद्ध म्हणून ठावा " ॥
तो भेटवी गुरुस शीघ्र वदून "होय" ! ।
अर्पीतसे त्वरित कीं तृषितास तोय. ॥ २३७ ॥

त्यां पूर्वकालिक,—नमस्कृतिपूर्व—वृत्त ।
सांगीतलें गुरुशिं राहुन अप्रमत्त ॥
येरू म्हणे " प्रकृतिनें दिसतोस पारा ।
होसी सतेज परि एकपदीं न थारा ॥ २३८ ॥



आरोग्यमंदिरिं इथें करितों उपाय ।
तेथें बघून बघ वैद्यक वस्तु काय ॥
राहील ही मति तुझी जर काल कांहीं ।
केलाच वैद्य तुजला, न विलंब पाहीं" ॥ २३९ ॥

आणी एकुलत्या सुतास विधवा माता धरोनी करा ।
बोले "वैद्यबुवा परीक्षिति असे. यातें निरोगी करा ॥
माझी आण वहाच ओषध न घे हा बाळ नाहीं कमी." ।
येरु बोलत " एक अर्ध तुम्हि घ्या अन्यार्ध घेईन मी !" ॥ २४० ॥

कोणी आंत शिरोनि मान हलवी पाहून वैद्याकडे ।
भाळीं लावुनि बोट वैद्य म्हणतो "आलें कसें सांकडें ॥
ज्याची आस नसे चिठी परतवी तो औषधावांचुनी ।
खात्रीनें जगणार तो फसवितो हीं औषधें सेवुनी !" ॥ २४१ ॥

वैद्या जोडुनि हात कोणि विनवी "ऐका वचा सादर ।
आली तापसरी. प्रमाण ? चढला त्या गोंवऱ्यांचा दर ॥
काढा द्या प्रतिबंधकारक;नको मागूनचा शामक ।"
घेई त्या बसवून वैद्य करुनी त्याचें जरा कौतुक. ॥ २४२ ॥

ठेवी कांपत अस्थिपंजर कुणी वैद्यापुढें आणुनी ।
वाटे जीवशुकी उडेल समया पाहोनि डोळ्यांतुनी ! ॥
आश्वासी तिज वैद्य हात बघुनी आलें तिला जें हसें ।
होतें फारचि तें भयंकर, मला छातींत धक्का बसे ! ॥ २४३ ॥

वामा एक वदे सगद्गदरवें "मी नम्र आहें पदीं ।
मानाची भगिनी तुम्हां प्रिय असो कृष्णा जशी द्रौपदी ! ॥
झाला वात भरून ताप, अगई! लागे धन्या घर्घर ॥
संभाळा ! सुयशास आंचवुं नका व्याधी जरी दुर्धर !" ॥ २४४ ॥

निघाया तत्कालीं, गुरु निज शिरस्त्राण चढवी ।
सवें घेई घाई करुनि पिशवी आणि बटवी ॥
म्हणे मातें हातें धरुन "चल ये ! वैद्यक बघें."
परी गेलों नाहीं कथुन"कळलें नीट अवघें"॥२४५॥

गेलों घरीं भिउनि तो दिन जाय सारा ।
निद्रा करी अभय रात्रिस तो उदारा. ॥
मीं काढिले प्रहर अंथरुणांत तीन ।
ती स्वप्नसृष्टि भिववी तशि जागृती न ॥२४६॥

पाहें तापसरी पुरांत पसरी प्रेतें न ज्यातें मिती ।
पाळ्या बांधव लावुनी दहनभूमाजी किती तिष्ठती ॥
बाळ, स्त्री, परिणीत, हें न गणुनी हा सुज्ञ, हा मन्दधी ।
मृत्यूनें अतिसंख्य कापणि अशी केली नसे हो कधीं ! ॥ २४७ ॥

मांडी देउनियां म्हणे कुणि " विघे होसी कसा घातक ! ।
बाळे तूं जप रामनाम तुजला होईल तें तारक "
थांबे तो जप सामसूम पसरे खोलींत कांहीं क्षण ।
पेटे मागुनि शोकवन्हि; विझण्या सध्या नसे लक्षण ! ॥ २४८ ॥

झाला भयें हळुहळू मम जीव गोळा ।
वाटे मुखांत कुणि दाबुन घालि बोळा ॥
आणी मला गदगदां हलवी; प्रभूचा ।
होऊन कोप जणुं वस्तुंस कंप भूचा ॥ २४९ ॥

झालों असा त्वरित मी दचकून जागा ।
म्यां पाहिलें उठुनि तों पहिलीच जागा ! ॥
लावोनियां फिरुनि पापणि पापणीला ।
निद्रेस आळवुं धजें नच पापिणीला. ॥ २५० ॥

प्राचीकडे वळवुनी अनिमेष नेत्र ।
म्यां काढिली बसुनि तिष्ठत शेष रात्र ! ॥





अनुक्रमणिका

प्रातः खरें कळविलें गुरु माउलीला ।
येरू वदे "तव खरी विचित्र लीला ॥ २५१ ॥

तूं जेविल्याविणचि धांवसि आंचवाया ।
आस्वाद सांगुं झटसी विसरून खाया !

लग्नाशिवाय कशि मोडिसि सांग काडी ।
आवाहनाविण विसर्जन कोण मांडी ? ॥ २५२ ॥

तूं वीर वाटशि अनागत युद्धकृत्या ।
भीतांक्षणीं करिशि जाऊन आत्महत्या ! ॥

मीं सांगतों प्रकृतिचें करुनी निदान ।
मानेल वृत्ति तुजला कसली निदान. ॥ २५३ ॥

चित्त स्थिरत्व तुज अल्प हि ठाउकें न ।
नौकाच वातहत दुःस्थित तूं म्हणून ॥

थोडी धरीं धृति, जिची उपमा रवीतें ।
कां कीं प्रकाशुनि विपत्तम घालविते ॥ २५४ ॥

सेवीत जा मम सदा धृतिगर्भमात्रा ।
पाडील पार तव संसृतिरूप यात्रा ॥

व्यापार आणि कृषि आणिक एक सेवा ।
यांच्या त्रयींत दुसरी तुज होय मेवा. ॥ २५५ ॥

ज्या भावना प्रबल अंगिं तुझ्या गड्या रे ।
सेवेस त्या खचित होतिल वावड्यारे. ॥

सेवा कधीं न इह वा परलोक देते ।
ना तैल तूप नच किन्तु धुपाटणें तें ॥ २५६ ॥

सत्याहुनि अधिक ज्यांत असत्य मावे ।
शाठ्येंच ज्यांत बहुधा जनवृद्धि पावे ॥
व्यापार वर्ज्य तुज तो जडसा पचाया ।
अस्वास्थ्यहेतु नव कारण झोंप जाया ॥ २५७ ॥

शेती सदैव बलवर्धन सात्विकास ।
तीनेंच पावतिल गूण तुझे विकास ॥
नेत्राम्बुवर्धन नकोत अनेक धंदे ।
बीं पेरशील तसलें फल ही कृषी दे." ॥ २५८ ॥

कर्णी पडे गुरुजिंची अशि उक्ति गार ।
आकाशिंची सुखकरी जशि गोड गार. ॥
शिष्या हितप्रद सदा गुरुची कृपाची ।
केली स्तुती करिल भाट जशी नृपाची. ॥ २५९ ॥

" होतों गटंकळित वृत्युदधींत येट ।
झालां गुरो ! मजसि तारक थोर बेट ।
केलें विनम्र शिर जोडुन दोन हात ।
आशीर्वचास मज द्या तिकडे पहात." ॥ २६० ॥

केलें अभीष्ट शुभचिंतन त्या गुरूनें ।
मीं वाहिलें स्वशिरिं वृष्टि जशी तरूनें. ।
मुंगीस पंख फुटतां उसळे नभीं ती ।
मींही तसा उसळलों न धरून भीती. ॥ २६१ ॥

माडया सोडुनियां दिल्या नगरच्या गाडयाहि घोडयांसह; ।
श्रेष्ठ प्रावरणादि षोक सगळे झाले मला दुःसह ।
आतां तें न घडयाळ गर्जन करी; तो आरवे कोंबडा; ।
कांदा भाकर चालती नच चहा काफी, न कोको बडा ॥२६२॥

भू खालतीं पसरते नभ तें वरून ।
खेळे स्वतंत्र मधुगन्धि हवा मधून.
होतां उषा प्रकट, आदरण्या रवीला ।
जाती पुढें विहग वर्णित थोरवीला. ॥ २६३ ॥

जाई पळून तम ऐकुं न नाम येत. ।
जम्बूक जाळित लपे करि अन्यबेत ॥
क्षेत्रीं शुचीकृत अशा कृषिकर्म चाले. ।
रत्नें अमूल्य पिकती परिपूर्ण काळें. ॥ २६४ ॥

उद्भिन्न गार हिरवें तृण, पाच होतें ।
दे माणिकास जनु दाडिम बीज हो तें. ॥
तैसेंच भात पिकवी मग पुष्कराजा ।
नीलाब्ज नीलमणिला प्रसवे बघा जा. ॥२६५॥




अनुक्रमणिका

पर्णोवरी दंव निशासमयीं पडून ।
टोंकावरी सरुन बिन्दु बने घडून ॥
संक्रान्त बालरविचीं किरणें तयांत ।
उत्पन्न उज्वल हिरा करिती क्षणांत ॥ २६६ ॥

अंभोजिनीदलगतोदकबिन्दुकान्ति ।
मुक्ताफलां पिकविते, नच शुक्तिका ती ! ॥
बिंबप्रभा परिणता बनतें प्रवाल. ।
रत्नें सजीव कथितों करितां सवाल ॥२६७॥

मोत्या, हिऱ्या व पंवळ्यासम माणक्याही ।
सारीं सदैव सुख देतिल पारख्याही ! ”
गोठ्यांत नित्य पय वाहवतात गाई ।
ऐशी दुधाळ सुरधेनु असेल काई ! ॥ २६८ ॥

वल्ली जशा सुरलता अज पालवोनी ।
जाती सदा फलभरें सकृपा लवोनी ।
येथें वसे म्हणुन पुष्टि व तुष्टि थोर ।
वाटे नको नगर दृष्टिसही समोर ॥ २६९ ॥

मातापिता अनुभवी अनुकूल भार्या ।
राखून गेह करितात समाजकार्या ।
ग्रामोन्नतीविण दुजें मज काम नाहीं ।
ईशें खरी पुरविली मम कामना ही ॥ २७० ॥

आम्हीं इथें रुजविलें सहकारतत्त्व ।
ज्याचीं रसाळ असतात फळें ससत्त्व ॥
उत्पन्न वार्षिक पडे दर माणसाशीं ।
तें पाहुनी जमविती जन वित्तराशी ॥ २७१ ॥

तींतून ते पुरवठा करिती धनाचा ।
बीं, बैल, नांगर अशा कृषि साधनांचा ।
धर्मप्रचारक व शिक्षक आणि वैद्य ।
गांवांत येति फिरते सकाळांस वंद्य. ॥ २७२ ॥

ठेवावया शिकुन निर्मळ ती रहाणी ।
रोगांवरी जन विघातक तीर हाणी ।
जो कीं अधीक पिकवी करुनी शिकस्त ।
राखीतसे व्यय करून अमुक्तहस्त ॥ २७३ ॥

होतो द्विवार जन तोच परोपकारी ।
साचार हें पढति तत्त्व, न जें विकारी ।
झाल्यास ते मिटविती झणिं वाद पंच ।
चाले म्हणून सुरळीतपणें प्रपंच. ॥ २७४ ॥

आम्हां भितो, दचकतो कलि झोंप येतां ।
कीं येथ सत्यपर धर्म वसे विजेता ॥
हा ग्राम होय पुर, देश व राजधानी ।
स्वर्गायमान पृथवी मनिं हीच मानीं ॥ २७५ ॥

आनंद येथ किति तों पुसण्या न सोय ।
आकाशही निरवकाश म्हणून होय ॥
तें सौख्य सर्व पुरसंभव दूर ठेवा ।
या हो ! पुरस्थजन येथिल सौख्य सेवा. ॥२७६॥

**समाप्त**




अनुक्रमणिका

# श्रीमन्नैषधकाव्यांतर्गत सुबोध वचनें

[ लेखकः—रा. रा. **प्रल्हाद धोंडो कानिटकर**, बी. ए., एलएल्. बी. ]

[ श्रीहर्षप्रणीत नैषधमहाकाव्यांतील सूक्तिसंग्रह सर्गानुक्रमानें केला आहे. प्रत्येक श्लोकाच्या पुढें सर्ग व श्लोकदर्शक अंक दिले आहेत. ]

( १ ) त्यजन्त्यसून् शर्म च मानिनोवरं ।
त्यजन्ति न त्वेकमयाचितव्रतम् ॥ १।५०

**अर्थः**—अभिमानी पुरुष प्राणाचा व सुखाचा सुद्धा त्याग करितात, परंतु श्रेष्ठ व अद्वितीय अशा अयाचित व्रताचा त्याग करीत नाहींत. ( याचनेपेक्षां प्राणत्याग बरा. )

( २ ) स्मरः स्मरत्यामनिरुद्धमेवयत् ।
सृजत्ययं सर्गनिसर्ग ईदृशः ॥ १।५४

**अर्थः**—मदन, प्रेमाच्या ठिकाणीं, मनुष्याला अवश करतो; सृष्टिप्रभाव हा अशा प्रकारचा आहे. ( प्रेमामुळें इंद्रियें मनुष्याच्या ताब्यांत राहत नाहींत).

(३) क्व भोगमाप्नोति न भाग्यभाग्जनः॥१।१०२

**अर्थः**—भाग्यवान् पुरुषाला सुख मिळत नाहीं असें कोणतें ठिकाण आहे ? ( भाग्यवान् पुरुषाला सर्वत्र सुख मिळतें ).

( ४ ) ब्रुवते हि फलेन साधवो
न तु कण्ठेन निजोपयोगिताम् ॥ २।४८

**अर्थः**—महात्मे आपला परोपकारगुण कार्य करून दाखवितात; शब्दांनीं बोलून दाखवीत नाहींत.

( ५ ) कार्ये निदानाद्धि गुणानधीते ॥ ३।१७

**अर्थः**—जें कार्य तें धरितसे गुण कारणाचें ।
( रघु० पंडित. )

( ६ ) प्रतीक्षते जातु न कालमार्तिः ॥ ३।९१

**अर्थः**—मानसिक व्यथेला कदापि कालक्षेप सहन होत नाहीं. ( मानसिक व्यथेला तत्काल उपाय न केल्यास मृत्यु येण्याचा संभव असतो ).

( ७ ) अपां हि तृप्ताय न वारिधारा ।
स्वादुः सुगंधिः स्वदते तुषारा ॥ ३ । ९३

**अर्थः**—जलपानानें तृप्त झालेल्या मनुष्याला, मधुर, सुगंधित व शीतल अशा जलधारेची रुचि लागत नाहीं.

( ८ ) पित्तेन दूने रसने सितापि ।
तिक्तायते हंसकुलावतंस ॥ ३ । ९४

**अर्थः**—हे हंसश्रेष्ठा, पित्तदोषानें दूषित झालेल्या रसनेंद्रियाला साखर सुद्धा कडू लागते.

(९)प्रियमनु सुकृताञ्च स्वस्पृहाया विलम्बः३।१३४

**अर्थः**—साधूंना इष्टार्थलाभ होण्यास केवळ त्यांच्या इच्छेचाच विलम्ब असतो. ( साधूंनीं एखाद्या वस्तूची इच्छा केल्याबरोबर तीं त्यांना प्राप्त होते. )

(१०) त्रसति कः सति नाश्रयबाधने ॥ ४।१६

**अर्थः**—आपण ज्याचा आश्रय केला—पुरुष वा वस्तु—त्याला पीडा झाली असतांना, कोण भीतियुक्त होत नाहीं ! (आश्रयाला पीडा झाली, म्हणजे आश्रितालाही होणारच.)

(११) झटिति पराशयवेदिनो हि विज्ञाः ॥४।११८

**अर्थः**—ज्ञाते लोक नुसत्या चेहऱ्यावरून तत्काल दुसऱ्याचें इंगित जाणतात.

(१२) साधने हि नियमोऽन्य जनानाम् ।
योगिनां तु तपसाखिलसिद्धिः ॥५।३

**अर्थः**—साधारण मनुष्यांना कार्यसिद्ध्यर्थ नियमित उपाययोजना करावी लागते. परंतु योग्यांची सर्व कार्यसिद्धि (साधनावांचून) केवळ तपःप्रभावानें होते.

(१३) कर्म कः स्वकृतमत्र न भुंक्ते ५।६

**अर्थ**—इहलोकीं स्वकर्माचीं फळें कोण भोगीत नाहीं ? (सर्वांना स्वकर्मफळ भोगावें लागतें.)

(१४) यावदर्हकरणं किल साधोः प्रत्यवायघुतये
न गुणाय ॥ ५।९

**अर्थः**—योग्यतेप्रमाणें साधूचा सन्मान केल्यानें, सन्मान न करण्याचा दोष लागत नाहीं; परंतु त्यामुळें




अनुक्रमणिका

विशेष आदर केल्याचें श्रेय मिळत नाहीं. (तात्पर्य, साधूंचा सन्मान योग्यतेपेक्षां जास्त करावा.)

(१४अ) आर्जवं हि कुटिलेषु न नीतिः ॥५-१०३

अर्थः-कपटी लोकांबरोबर निष्कपटानें वागणें योग्य नाहीं.

(शठं प्रति शाठ्यं याच न्यायानें वागलें पहिजे.)

(१५) दुर्जया हि विषया विदुषापि ॥५।१०९

अर्थः-शब्दादि इंद्रियविषय ज्ञात्याला सुद्धा अजिंक्य आहेत.

(१६) स्वतः सतां ह्रीः परतोऽपि गुर्वी ॥ ६।२२

अर्थः-अनिच्छेनें अकार्य घडलें किंवा घडत असलें, तरी सुद्धा सज्जनाला दुसऱ्यापेक्षां स्वतःचीच अधिक लाज वाटते.

(१७) विवेकधाराशतधौतमन्तः
संता न कामः कलषीकरोति ॥८।५४

अर्थः-विचारप्रवाहानें शतवार उज्ज्वलित झालेलें सज्जनांचें मन मदनाला कलुषित करतां येत नाहीं.

(१८) नामापि जागर्ति हि यत्र शत्रो
स्तेजस्विनस्तं कतमे सहन्ते ॥ ८।७४

अर्थः-जो आपल्या शत्रूचें नांव धारण करतो, अशा पुरुषाची उपेक्षा कोणते तेजस्वी पुरुष करतील!

(१९) कृच्छ्रेऽप्यसौ नोज्झति तस्य सेवां
सदा यदाशामवलम्बते यः ॥८।७८

अर्थः-जो नेहेमी ज्याच्या आशेवर (लाभार्थ) राहतो तो त्याची सेवा, स्वतःला कष्ट पडले तरी सुद्धा, करण्याचें सोडीत नाहीं.

(२०) पिपासुता शान्तिमुपैति वारिजा
न जातु दुग्धान्मधुनो ऽधिकादपि ॥९।५

अर्थः-पाण्याची तहान पुष्कळ दुधानें किंवा मधानें शांत होत नाहीं.

(२१) गरौ गिरः पल्लवनार्थलाघवे
मितं च सारं च वचो हि वाग्मिता ॥९।८

अर्थः-शब्दावडंबर व अर्थसंकोच हे वाणीचे विषतुल्य दोष आहेत; थोडक्या शब्दांत अर्थगौरव-युक्त भाषण करणें हें पांडित्याचें लक्षण आहे.

(२२) जनः किलाचारमुचं विगायति ॥ ९।१३

अर्थः-शास्त्रप्रणीत आचार सोडून वागणाऱ्याची लोक निंदा करतात.

(२३) निषिद्धमप्याचरणीयमापदि
क्रिया सती नावति यत्र सर्वथा।
घनाम्बुना राजपथे हि पिच्छिले
क्वचिद् बुधैरप्यपथेन गम्यते ॥ ९-३६

अर्थः-आपत्कालीं शास्त्रशुद्ध आचरण करून जर कोणत्याही प्रकारानें आत्मरक्षण होत नसेल, तर निषिद्ध मार्गाचा अवलंब करावा.

उदाहरणार्थः-पावसानें राजरस्त्यावर चिखल झाला असतांना, पंडितसुद्धा कधीं कधीं आडमार्गानें जातात.

(२४) चकास्ति योग्येन हि योग्यसंगमः ९।५६

अर्थः-योग्य वस्तूशीं योग्य वस्तूचा संगम शोभादायक होतो.

(२५) वैरविधिर्वधावधिः ॥९।९३

अर्थः-वैर मरणपर्यवसायि असतें.

(२६) जनानने कः करमर्पयिष्यति ॥९।१२५

अर्थः-लोकांच्या तोंडाला कोणाला हात लवतां येणार आहे!

(२७) न वस्तु दैवस्वरसाद्विनश्वरं
सुरेश्वरोऽपि प्रतिकर्तुमीश्वरः ॥९।१२६

अर्थः-दैवाच्या इच्छेनें एखाद्या वस्तूचा नाश होत असेल, तर तो नाश टाळण्यास प्रत्यक्ष इंद्र सुद्धा समर्थ नाहीं.

(२८) स्वाभाविकात्कृत्रिममन्यदेव ॥१०।१९

अर्थः-स्वाभाविक व कृत्रिम यांत महदंतर असतें.




अनुक्रमणिका

(२९) आत्मापकर्षे सति मत्सराणां
द्विषः परस्पर्धनया समाधिः॥१३।४२

अर्थः—शत्रूकडून स्वतःस न्यूनत्व प्राप्त झालें असतांना, दुसऱ्यांनीं त्या शत्रूची बरोबरी केली तर त्यामुळें मत्सरी लोकांना समाधान वाटतें.

(३०) गुणेन केनापि जनेऽनवद्ये
दोषान्तरोक्तिः खलु तत्खलत्वम् ॥१०।४३

अर्थः—पूज्य पुरुषाच्या ठिकाणीं एखाद्या लोकोत्तर गुणाचा अभाव दाखवून त्याला दोष लावणें याचेंच नांव खलत्व.

(३१) सुरेषु विघ्नैकपरेषु को नरः
करस्थमप्यर्थमवाप्तुमीश्वरः ॥९।८३

अर्थः—देव जर विघ्न करूं लागले, तर हातांत आलेली सुद्धां वस्तु मिळण्याला कोणता पुरुष समर्थ होईल? ( अर्थात् कोणीही समर्थ होणार नाहीं. )

(३२) एकाम्बुबिन्दुव्ययमम्बुराशेः
पूर्णस्य कः शंसति शोषदोषम् ॥१०।६४

अर्थः—जलाचा एक कण नाहींसा झाल्यामुळें भरलेला समुद्र शुष्क झाला असें कोणी म्हणत नाहीं.

(३३) सुरेषु हि श्रद्दधतां नमस्या
सर्वार्थसिध्यंगमियः समस्या ॥१४।३

अर्थः—श्रद्धापूर्वक देवांना नमस्कार केल्यानें सर्वार्थसिद्धिप्राप्तीचीं साधनें परिपूर्ण होतात.

(३४) देवा हि नान्यद्वितरंति किन्तु
प्रसद्य ते साधुधियं ददन्ते ॥१४।९

अर्थः—देव प्रसन्न झाले असतांना ( भक्ताला ) कांहीं उचलून देत नाहींत; परंतु त्याची इष्टार्थसिद्धि व्हावी म्हणून कार्यसाधक अशी बुद्धि देतात. (न देवा दण्डमादाय रक्षन्ति पशुपालवत् । यं तु रक्षितुमिच्छन्ति सुबुद्ध्या योजयन्ति तम् ॥ महाभारत ॥ शिवाजीची आग्र्याहून सुटका हा या तत्त्वाचा समर्पक दृष्टान्त आहे )

(३५) अमुञ्चतः पुण्यमनन्यभक्तेः
स्वहस्तवास्तव्य इव त्रिवर्गः ॥ १४।८१

अर्थः—परमेश्वराच्या ठिकाणीं अनन्यभक्ति ठेवून जो पुण्यमार्ग सोडीत नाहीं,अशा पुरुषाच्या, धर्म, अर्थ व काम हे तीन पुरुषार्थ, हातांत असल्यासारखे आहेत.

(३६) आहता हि विषयैकतानता
ज्ञानधौतमनसं न लिम्पति ॥१८।२

अर्थः—परमात्मज्ञानानें ज्याचें मन शुद्ध झालें आहे, अशा पुरुषाला कृत्रिम विषयासक्तीमुळें पापसंस्पर्श होत नाहीं.




अनुक्रमणिका

॥ श्री ॥

# विविधज्ञानविस्तार

## मासिक पुस्तक

### वर्ष ६४ वें

**माहे जानेवारी १९३३**

**ते**

**माहे डिसेंबर १९३३**

श्रीलक्ष्मी-नारायण प्रेस, मुंबई

Editor and Publisher A. A. Moramkar

Printed by R. K. Tatnis at Shree Laxmi-Narayan Press.. Published for Nadkarni & Mandali, at 364 Thakurdwar, Bombay 2.






अनुक्रमणिका

# विविधज्ञानविस्तार

## वर्ष चौसष्टावें

## या पुस्तकांतील लेखक व कवि





# विविधज्ञानविस्तार

## चौसष्टाव्या वर्षाची अनुक्रमणिका

### लेख, कविता वगैरे





## स्वतंत्र विषय





# पेशवे व विधवावपन

[ लेखकः—रा. रा. **केशवाचार्य गजेंद्रगडकर**, बी. ए., (ऑनर्स), एल्‌एल्. बी. ]

'हा छोटा लेख ता. २।११।३३ च्या ज्ञान-
शामध्यें प्रसिद्ध झाला आहे. परंतु लेखांत उल्लेख
ला सुबोधपत्रिकेचा अंक व त्यामध्यें आलेलें पत्र
महत्त्व लक्षांत घेऊन तो 'विस्तारांत' पुन्हा
द्ध करीत आहें.–लेखक )

हिंदुसमाजामध्यें विधवेचें वपन करण्याची गलिच्छ अत्यंत अनिष्ट रूढि बुद्धकालापासून प्रचारांत ी. या रूढीस खऱ्या वैदिक व सनातन धर्मग्रांत आधार बिलकुल नाहीं, ही गोष्ट श्री. **ानेश्वरयतींनीं** आपल्या "विधवावपन-शास्त्रार्थाधीं अखेर निर्णय" या पुस्तकांत सप्रमाण रीतीनें द केली आहे. ही गोष्ट नुक्तीच धुळें येथें झालेल्या ीत **महामहोपाध्याय श्रीधरशास्त्री पाठक** ीं अधिकारयुक्त वाणीनें सिद्ध केली आहे. जरी ही ढ बुद्धकालापासून सुरू झाली, तरी पेशव्यांच्या काळीं चाल कायद्यानें सार्वत्रिक करण्याचा प्रयत्न ण्यांत आला असें दिसतें.

सुबोधपत्रिकेनें आपला हीरकोत्सव खास अंक द्ध केला आहे त्यांत "सुबोधपत्रिकेची कामगिरी" लेखांत पृष्ठ ८३ वर खालील अवतरण आहे.

**"The reader may perhaps remember letter published in our vernacular lumns a few months ago from a asik priest that** *this practice of shaving dows was by a summary act introduced the Peshawas."* ( 25-5-90 )

. उताऱ्यावरून विधवावपनासंबंधीं चाल पेशवे रकार यांनीं आपल्या **तांतडीच्या फर्मानानें** ummary act सुरू केली, असा उल्लेख नाशिक धील एका उपाध्यायानें पत्र लिहून सुबोधपत्रिकेंत ला आहे व तें पत्र २५–५–९० च्या पूर्वी कांहीं हिने सुबोधपत्रिकेच्या अंकांत छापिलें होतें. तें पत्र मिळण्याबद्दल पत्रिकेचे संपादक **श्री. द्वा. गो. वैद्य** यांना प्रस्तुत लेखकानें पत्रही लिहिलें होतें; त्या पत्राच्या उत्तरांत **श्री. द्वा. गो. वैद्य** लिहितात,

"आपलें पत्र आल्यावर फाईली पाहतां १८८९–९० ची फाईल आमच्या संग्रहीं नाहीं असें आढळून आलें !! पत्रिकेचें वर्ष मे महिन्यांत सुरू होतें. म्हणून १८८९–९० ची फाइल मिळणें अगत्याचें होतें. पण ती आमच्या संग्रहीं नाहीं."

या बाबतींत १८८९–९० च्या फाइलीमधील नाशिकच्या त्या उपाध्यायाचें पत्र मिळणें फार अगत्याचें आहे. म्हणून सर्व लायब्ऱ्यांचे चालक, सुबोधपत्रिकेचे पहिल्यापासून असलेले वर्गणीदार, इतिहासप्रेमी लोक या सर्वांस प्रस्तुत लेखकाची **अत्यंत आग्रहाची विनंती** आहे कीं, त्यांनीं सुबोधपत्रिकेची १८८९–९० ची फाइल मिळवून तीमधील वरील पत्र साग्र अवश्य प्रसिद्ध करावें. तूर्त तरी वर दिलेल्या इंग्रजी अवतरणावरून दोन अनुमानें निघतात.

पहिलें अनुमान हें कीं, महाराष्ट्रांत तरी ही विधवावपनाची गलिच्छ चाल पेशवे काळांत जास्त रूढ झाली असली पाहिजे. यावरून या चालीस सनातनत्व कितपत येईल याही गोष्टीचा विचार झाला पाहिजे. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे, विधवावपनासारख्या पवित्र चालींत सुद्धा पेशवे हात घालीत होते. यावरून सामाजिक व धार्मिक बाबतींत सुद्धा पेशवे सरकार हात घालीत होते. त्या वेळेस **धर्मावर घाला** घातला असें झालें नाहीं. जर पेशवे सरकार धर्मासंबंधीं गोष्टींत फर्मानें काढीत होते, तर राष्ट्रीय व प्रातिनिधिक पद्धतीनें बनविलेल्या कायदेमंडळांत धार्मिक अथवा सामाजिक गोष्टींसंबंधीं जर कायदा केला, तर धर्मावर घाला घातला अशी ओरड करणें म्हणजे अज्ञान प्रकट करून आपण रूढीचे बंदे गुलाम आहों असें जाहीर करणें नव्हे का ?

---




अनुक्रमणिका

 Registered No. 577 B

## वर्गणीदारांस विनंती

दरसालप्रमाणें 'विस्तारा'चा यापुढील म्हणजे जानेवारी १९३४ चा अंक १९३४ सालाची वर्गणी वसूल करण्यासाठीं 'विस्तारा'च्या वर्गणीदारांकडे व्ही. पी. नें. पाठविण्यांत येईल. ज्यांना पुढील वर्षी वर्गणीदार राहावयाचें नसेल, त्यांनीं ता. १५ एप्रिलपर्यंत तसें कळवावें.

मॅनेजर, **विविधज्ञानविस्तार**

## पोंच आणि अभिप्राय

**सुलभ नीतिशास्त्र व नीतिशास्त्रप्रबोधः**— ही दोन्ही पुस्तकें रा. रा. दाजी नागेश आपटे, बी. ए., एल्एल्. बी., बडोदे, यांनीं लिहिलीं आहेत. पहिलें पुस्तक लहानसें ९० पृष्ठांचें असून दुसरें ३७७ पृष्ठांचें आहे. पहिल्यांत साधारणतः नीतिकल्पनेचा साधारण विचार करून विशेषतः पाश्चात्य पद्धतीचा नीतिविचार थोडक्यांत सांगितला आहे. दुसरें पुस्तक हिंदी नीतिशास्त्र व पश्चिमेकडील नीतिशास्त्र यांच्या विकासाच्या इतिहासाची व तुलनेची माहिती देण्याच्या उद्देशानें लिहिलें आहे. पहिलें पुस्तक लहानसें निबंधवजा आहे, तरी तें वाचणारास पाश्चात्य नीतिशास्त्र हें काय आहे, याची कल्पना येईल. परंतु नीतिशास्त्रप्रबोधांत लिहिलेल्या विषयाचें स्वरूपच एवढें मोठें आहे कीं, कित्येक ठिकाणीं जवळजवळ अनेक मतांच्या नांवांचा उल्लेख अगर त्यांचें सूत्रमय वाक्यांत थोडेंसें वर्णन करणें ग्रंथकर्त्याला भाग पडलें असावें असें वाटतें. वॉलेस, हेकेल वगैरे शास्त्र्यांच्या मतां संबंधाचें वर्णन पाहिल्यास ही गोष्ट लक्षांत येईल. 'गीतारहस्या'चें वर्णन वाचल्यास, त्या पुस्तकांतील विचारसरणीचा उल्लेखही न करतां तें पुस्तक उत्तम असून सर्व नैतिक उपपत्तींत गीतेची उपपत्ति श्रेष्ठ आहे, असें टिळकांनीं सिद्ध केलें व त्यांच्या संप्रदायाचें महत्त्व शंकराचार्यांच्या मार्गाइतकेंच आहे, असें लिहिलें आहे. तें कां व कसें याचा थोडा तरी उल्लेख पुस्तकांत पाहिजे होता. तसेंच पुस्तक लिहितांना कदाचित् घाई झाल्यामुळें भाषांतरा सारखा दिसणारा भागही कांहीं ठिकाणीं फारच क्लिष्ट राहिला आहे. उदाहरणार्थः '७'१. मनुष्याच्या बुद्धिविकासाचें उत्कृष्ट फळ म्हणून ज्या काव्य शक्तिसारख्या आपण मानतों, त्यासुद्धा जनावरांत दिसून येतात. सिंहिणीचें आपल्या बच्चावरील अपत्यप्रेम, पोपटांच्या नरमादींतील परस्परप्रीति, कुत्र्यांचा इमानीपणा हीं प्रसिद्धच आहेत. याच भावना मनुष्यांत दिसतात, व त्या जगतांत धर्माच्या अथवा देवत्वाच्या कल्पनेचा उद्गम होण्यापूर्वीपासून उत्पन्न झालेल्या आहेत.'

तुलनात्मक विचार करतांना हिंदु व पाश्चात्यांतील विशेषतः ख्रिस्ती धर्मानुसारी नीतिशास्त्र यांचीच तुलना केली आहे. पश्चिमेकडील नीतिशास्त्रानें आपल्या वाढीबरोबर हळूहळू आपल्यावर असलेली धर्माची छाया बाजूस करण्याचा प्रयत्न केला असून फक्त तात्त्विक विचारांवरच त्याची उभारणी करण्यांत येत आहे. परंतु हिंदु नीतिशास्त्र हें धर्माशीं अत्यंत निगडित आहे; व त्यांत झालेली प्रगति धर्माच्या नांवाखालींच करावी लागते असें दिसून येतें. तेव्हां दोन्ही नीतिशास्त्रांची तुलना करतांना ख्रिस्तीधर्माच्या अनुरोधानें वर्णन केलेल्या नीतीशींच तुलना न करतां ती तिकडील असल्यामुळें कदाचित् या गोष्टी साध्य झाल्या नसाव्या. मुद्रिताचे दोष तर कांहीं राहिले आहेतच. परंतु नजरचुकीमुळेंही कांहीं ठिकाणीं घोटाळा झाला आहे, असें दिसून येतें. उदाहरणार्थ, प्रस्तावनेंत पुढील वाक्य आढळतें. "अशा रीतीनें तात्कालिक व क्षणिक लाभाची कसोटी कर्माच्या औचित्याला लावणारी विचारसरणी अप्रबुद्ध होय, असें अनुभवान्तीं समजून येतें, व '**यत्तदग्रेऽमृतोपमम् परिणामे विषमिव। असेंच कर्म उचित** असा निश्चय विचारानें ठरतो. तथापि क्षणिक फलप्रद कृत्यालाही उचित समजणारी विचारसरणी सांपडते व ती चार्वाकपंथी होय."

दुसरी आवृत्ति काढण्याचा योग आल्यास हे दोष दूर होऊन सर्वांगपूर्ण व विस्तृत आवृत्ति ग्रंथकर्त्याकडून निघेल अशी आशा आहे.



## वर्गणीदारांस विनंती

दरसालप्रमाणें 'विस्तारा'चा यापुढील म्हणजे जानेवारी १९३४ चा अंक १९३४ साला[illegible] वर्गणी वसूल करण्यासाठीं 'विस्तारा'च्या वर्गणीदारांकडे व्ही. पी. नें. पाठविण्यांत येईल[illegible] ज्यांना पुढील वर्षी वर्गणीदार राहावयाचें नसेल, त्यांनीं ता. १५ एप्रिलपर्यंत तसें कळवा[illegible]

मॅनेजर, **विविधज्ञानविस्तार**

# पोंच आणि अभिप्राय

**सुलभ नीतिशास्त्र व नीतिशास्त्रप्रबोध:**— ही दोन्ही पुस्तकें रा. रा. दाजी नागेश आपटे, बी. ए., एलूएल्. बी., बडोदे, यांनीं लिहिलीं आहेत. पहिलें पुस्तक लहानसें ९० पृष्ठांचें असून दुसरें ३७७ पृष्ठांचें आहे. पहिल्यांत साधारणतः नीतिकल्पनेचा साधारण विचार करून विशेषतः पाश्चात्य पद्धतीचा नीतिविचार थोडक्यांत सांगितला आहे. दुसरें पुस्तक हिंदी नीतिशास्त्र व पश्चिमेकडील नीतिशास्त्र यांच्या विकासाच्या इतिहासाची व तुलनेची माहिती देण्याच्या उद्देशानें लिहिलें आहे. पहिलें पुस्तक लहानसें निबंधवजा आहे, तरी तें वाचणारास पाश्चात्य नीतिशास्त्र हें काय आहे, याची कल्पना येईल. परंतु नीतिशास्त्रप्रबोधांत लिहिलेल्या विषयाचें स्वरूपच एवढें मोठें आहे कीं, कित्येक ठिकाणीं जवळजवळ अनेक मतांच्या नांवांचा उल्लेख अगर त्यांचें सूत्रमय वाक्यांत थोडेंसें वर्णन करणें ग्रंथकर्त्याला भाग पडलें असावें असें वाटतें. वॉलेस, हेकेल वगैरे शास्त्र्यांच्या मतां·संबंधाचें वर्णन पाहिल्यास ही गोष्ट लक्षांत येईल. 'गीतारहस्या'चें वर्णन वाचल्यास, त्या पुस्तकांतील विचारसरणीचा उल्लेखही न करतां तें पुस्तक उत्तम असून सर्व नैतिक उपपत्तींत गीतेची उपपत्ति श्रेष्ठ आहे, असें टिळकांनीं सिद्ध केलें व त्यांच्या संप्रदायाचें महत्त्व शंकराचार्यांच्या मार्गाइतकेंच आहे, असें लिहिलें आहे. तें कां व कसें याचा थोडा तरी उल्लेख पुस्तकांत पाहिजे होता. तसेंच पुस्तक लिहितांना कदाचित् घाई झाल्यामुळें भाषांतरासारखा दिसणारा भागही कांहीं ठिकाणीं फारच क्लिष्ट राहिला आहे. उदाहरणार्थः '७९. मनुष्याच्या बुद्धिविकासाचें उत्कृष्ट फळ म्हणून ज्या काव्यशक्तिसारख्या आपण मानतों, त्यासुद्धा जनावरांत दिसून येतात. सिंहिणीचें आपल्या बच्चावर[illegible] अपत्यप्रेम, पोपटांच्या नरमादींतील परस्परप्री[illegible] कुत्र्यांचा इमानीपणा हीं प्रसिद्धच आहेत. या[illegible] भावना मनुष्यांत दिसतात, व त्या जगतांत धर्मा[illegible] अथवा देवत्वाच्या कल्पनेचा उद्गम होण्यापूर्वीपास[illegible] उत्पन्न झालेल्या आहेत.'

तुलनात्मक विचार करतांना हिंदु व पाश्चात्[illegible]तील विशेषतः खिस्ती धर्मानुसारी नीतिशास्त्र यांची तुलना केली आहे. पश्चिमेकडील नीतिशास्त्रानें आप[illegible] वाढीबरोबर हळूहळू आपल्यावर असलेली धर्माची छा[illegible] बाजूस करण्याचा प्रयत्न केला असून फक्त तात्त्वि[illegible] विचारांवरच त्याची उभारणी करण्यांत येत आ[illegible] परंतु हिंदु नीतिशास्त्र हें धर्माशीं अत्यंत निगडि[illegible] आहे; व त्यांत झालेली प्रगति धर्माच्या नांवाखालीं करावी लागते असें दिसून येतें. तेव्हां दोन्ही नी[illegible]शास्त्रांची तुलना करतांना खिस्तीधर्माच्या अनुरोध[illegible] वर्णन केलेल्या नीतीशींच तुलना न करतां ती तिकड[illegible] असल्यामुळें कदाचित् या गोष्टी साध्य झाल्या नसाव्य[illegible] मुद्रिताचे दोष तर कांहीं राहिले आहेतच. परंतु नज[illegible] चुकीमुळेंही कांहीं ठिकाणीं घोटाळा झाला आ[illegible] असें दिसून येतें. उदाहरणार्थ, प्रस्तावनेंत पुढ[illegible] वाक्य आढळतें. "अशा रीतीनें तात्कालिक व क्षणि[illegible] लाभाची कसोटी कर्माच्या औचित्याला लावणा[illegible] विचारसरणी अप्रबुद्ध होय, असें अनुभवान्तीं समज[illegible] येतें, व '**यत्तदग्रेऽमृतोपमम् परिणामे विषमि[illegible] असेंच कर्म उचित** असा निश्चय विचारानें ठर[illegible] तथापि क्षणिक फलप्रद कृत्यालाही उचित समजण[illegible] विचारसरणी सांपडते व ती चार्वाकपंथी होय."

दुसरी आवृत्ति काढण्याचा योग आल्यास हे दं[illegible] दूर होऊन सर्वांगपूर्ण व विस्तृत आवृत्ति ग्रंथक[illegible] कडून निघेल अशी आशा आहे.





अनुक्रमणिका